चौथी माला

मराठी

# बालभारती

इयत्ता चौथी



# फुलाची शोभा वाढवा (६.४.१)

## एकाच नामाला लागणाऱ्या विविध विशेषणांची ओळख

सूचना : एक वा अनेक विद्यार्थ्यांना हा खेळ खेळता येईल.
वेळ १० मिनिटे.

खाली गुलाबाच्या फुलाचे चित्र दिले आहे. या फुलासंबंधी वापरली जाणारी विविध विशेषणे तुम्ही लिहायची आहेत. संकेतासाठी प्रत्येक विशेषणाचे पहिले अक्षर दिलेले आहे व बाकीची अक्षरे तुम्ही भरायची आहेत. अक्षरे अशी भरा, की विशेषणाचा योग्य शब्द तयार होईल. ५ मिनिटांत जे विद्यार्थी सर्व शब्द अचूकपणे भरतील ते जिंकतील.



शिक्षण खात्याचा मंजुरी क्रमांक : पापुमं/१०९८/१४८५२/४ थी भाषा/मराठी/स-पुस्तक दि. १७.२.९८

# मराठी

# बालभारती

## इयत्ता चौथी





नाव ____________

शाळा ____________

इयत्ता ________ तुकडी ________

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे.

| | | |
|---|---|---|
| प्रथमावृत्ती : १९९८<br>सुधारित आवृत्ती :<br>२००२<br>पाचवे पुनर्मुद्रण :<br>२००७ | © | **महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे - ४११००४.**<br>या पुस्तकाचे सर्व हक्क महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाकडे राहतील. या पुस्तकातील कोणताही भाग संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांच्या लेखी परवानगीशिवाय उद्धृत करता येणार नाही. |
| **मराठी भाषा समिती** | : | **प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष**<br>**श्री. व. द. देसाई, सदस्य**<br>**श्री. ह. गं. नारलावार, सदस्य**<br>**श्रीमती रेणू दांडेकर, सदस्य**<br>**श्रीमती वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य**<br>**श्रीमती शीला गुर्जरपाध्ये, निमंत्रित सदस्य**<br>**श्री. वि. द. इनामदार, निमंत्रित सदस्य**<br>**श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव** |
| **संयोजन** | : | माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग<br>श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक, मराठी |
| **चित्रकार** | : | श्री. मुकुंद तळवलकर, श्री. चंद्रकांत तजबिजे |
| **मुखपृष्ठ** | : | श्री. घनश्याम देशमुख |
| **अक्षरजुळणी** | : | संगणक विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४. |
| **निर्मिती** | : | श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. संजय कांबळे, निर्मिती अधिकारी |
| **कागद** | : | ७० जी. एस्. एम्., क्रीम वोव्ह |
| **मुद्रणादेश** | : | N/Tec/2006-07/3398 (संख्या : १,००,०००) |
| **मुद्रक** | : | वीर भूमि प्रिंटिंग प्रैस, जालन्धर। |
| **प्रकाशक** | : | डॉ. वसंत काळपांडे,<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई ४०००२५. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत. माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन. मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन. माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

## प्रस्तावना

'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' नुसार पाठ्यपुस्तक मंडळाने मराठी बालभारती, इयत्ता चौथी हे पाठ्यपुस्तक १९९८ साली प्रकाशित केले. 'सरस-२००१' या प्रकल्पांतर्गत चौथीच्या पुस्तकाची सुधारित आवृत्ती आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

चौथीचे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील प्राथमिक शिक्षक आणि विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे **प्रकाशनपूर्व** समीक्षण करण्यात आले होते. पुस्तक आहे, त्यापेक्षा अधिक निर्दोष, अधिक दर्जेदार आणि अधिक प्रभावी होण्यासाठी पाठ्यपुस्तक मंडळाने **प्रकाशनोत्तर** समीक्षणाचा **'सरस-२००१'** हा संशोधन प्रकल्प हातीं घेतला. या प्रकल्पात पुढील चार मार्गांनी पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले.

१. महाराष्ट्रातील निवडक शाळांकडून चाचणीद्वारे वर्षभर प्रत्याभरण घेणे;
२. विषयतज्ज्ञांकडून परीक्षण करून घेणे;
३. संस्था व व्यक्ती पातळीवर संशोधन प्रकल्प घेणे; आणि
४. शिक्षक, पालक यांच्याकडून आलेली पत्रे, वृत्तपत्रांतून छापून आलेली टीकात्मक परीक्षणे यांतील सूचनांचा विचार करणे.

सन १९९९-२००० या शैक्षणिक वर्षात वरील चारही मार्गांनी आलेल्या सूचना व अभिप्रायांचा विचार करून मराठी समितीने या पुस्तकाची सुधारित आवृत्ती या वर्षी तयार केली आहे.

शिक्षकांचे अध्यापन नेमके आणि अधिक प्रभावी व्हावे, म्हणून पाठांवरील प्रत्येक स्वाध्यायास क्षमता क्रमांक आणि आवश्यक तेथे शिक्षकांसाठी सूचना दिलेल्या आहेत.

शिक्षकांप्रमाणेच पालकही विद्यार्थ्यांच्या स्वयंअध्ययनात मदत करू शकतील असे या पुस्तकाचे स्वरूप ठेवले आहे. मराठी समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी समितीचे आणि पाठ्यपुस्तक लेखनामध्ये ज्या शिक्षकांचे, तज्ज्ञांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

पालक, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या दृष्टीने अधिक उपयुक्त अशा या सुधारित आवृत्तीचे सर्वांकडून स्वागत होईल, अशी आशा आहे.

(एन. के. राठोड)
संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे
दिनांक : ३१ डिसेंबर, २००१
१० पौष, शके १९२३

## क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण त्याच्या गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात प्रत्येक विद्यार्थ्याने जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत, अशी अपेक्षा आहे. विद्यार्थ्यांच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित विशिष्ट क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत, त्यांतील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्व पातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी करायचा आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वत: तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये, वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा हेतू असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून तो साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा.

क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्ययनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

## क्षमतांची यादी
## (१९९५ च्या अभ्यासक्रमातून)

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| श्रवण | १.४.१ | परिचित प्रसंगातील सोपी भाषणे समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.४.२ | अपरिचित प्रसंगातील संवाद आणि संभाषण समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.४.३ | एखादी कृती करण्यासंबंधी दिलेल्या तोंडी सूचना समजपूर्वक ऐकता येणे. |
| भाषण | २.४.१ | सहजपणे न अडखळता बोलता येणे. |
| | २.४.२ | कविता, गाणी योग्य प्रकारे सादर करता येणे. |
| | २.४.३ | अपरिचित वस्तूंचे व पदार्थांचे वर्णन करता येणे. |
| | २.४.४ | सोप्या विषयावरील वर्गचर्चेत भाग घेता येणे. |
| वाचन | ३.४.१ | शब्द-चित्रमालिका आणि भित्तिपत्रके समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.४.२ | हस्तलिखित मजकूर, पत्रे व सूचना समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.४.३ | मुलांसाठी असलेली नियतकालिके, पुस्तके समजपूर्वक वाचता येणे. |
| लेखन | ४.४.१ | नीटनेटके व सुवाच्य लिहिता येणे. |
| | ४.४.२ | सोप्या विरामचिन्हांनी युक्त असलेल्या मजकुराचे श्रुतलेखन करता येणे. |
| | ४.४.३ | परिच्छेद व विरामचिन्हे असलेले निबंधात्मक लेखन मार्गदर्शनाखाली करता येणे. |
| आकलन (ऐकून व वाचून) | ५.४.१ | ऐकलेल्या किंवा वाचलेल्या मजकुरातील संकल्पना समजणे. (घटनांमधील कार्यकारणभाव ओळखता येणे.) |
| | ५.४.२ | मजकूर ऐकून किंवा वाचून 'कारण की', 'म्हणून' अशा शब्दांचा उपयोग करून प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| कार्यात्मक व्याकरण | ६.४.१ | वाक्यरचनेसंबंधी नियम समजून वापरता येणे. |
| स्वयंअध्ययन | ७.४.१ | चित्र-शब्दकोशाचा उपयोग करता येणे. |
| भाषेचा व्यवहारात उपयोग | ८.४.१ | औपचारिक भाषा व अनौपचारिक भाषा यांतील फरक लक्षात घेऊन बोलता येणे. |
| शब्दसंपत्तीवर प्रभुत्व | ९.४.१ | सुमारे ४००० शब्दांचे आकलन होणे. |

## (१९९५ च्या अभ्यासक्रमातून)

**कोणत्या अध्ययन क्षमतेसाठी कोणते अध्ययन अनुभव/उपक्रम घ्याल ? खालील तक्ता पाहा. याचा वर्षभर उपयोग करा.**

| अध्ययन क्षमता क्रमांक | | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|---|
| १.४.१ | १. | पुढील प्रसंगी भाषणे आयोजित करणे व त्यांवर आधारित एक-दोन प्रश्न विचारणे - स्वातंत्र्यदिन, शिक्षकदिन, जयंती-पुण्यतिथी उत्सव, स्नेहसंमेलन इत्यादी. |
| | २. | बालसभेत मुलांची भाषणे आयोजित करून ऐकवणे. |
| १.४.२ | १. | शाळेतील उपक्रमांमधील संभाषणे, संवाद ऐकवणे व त्यांवर प्रश्न विचारणे. |
| | २. | पाठ्येतर नाट्य-उताऱ्यांचे वाचन ऐकवणे. |
| | ३. | पाठ्येतर कथांमधील संवादात्मक भाग, संवादात्मक कविता व संगीतिका ऐकवणे. |
| | ४. | संवाद असलेली गोष्ट परिणामकारक रीतीने सांगणे. |
| | ५. | ध्वनिफितीवरील संवाद ऐकवणे. |
| | ६. | आकाशवाणी व दूरदर्शनवरील कार्यक्रमांतील श्रुतिका, नाटिका व भाषणे ऐकवणे व त्यांवर प्रश्न विचारणे. |
| १.४.३ | १. | हस्तव्यवसाय, वर्ग-सजावट, प्रदर्शन यांसारख्या उपक्रमांमध्ये सूचना देऊन त्यांचे पालन करून घेणे. उदा. राखी, भेटकार्ड, आकाशकंदिल, मातीकाम, कागदकाम, पुठ्ठाकाम इत्यादी. |
| २.४.१ | १. | शाळेतील कार्यक्रम साजरे करताना भाषण करण्यासाठी तयारी करवून घेणे. |
| | २. | विषय देऊन मुद्देसूद भाषणासाठी विद्यार्थ्यांची तयारी करवून घेणे. |
| | ३. | वर्तमानपत्रांत वाचलेल्या बातम्या सांगण्याची संधी उपलब्ध करून देणे. |
| | ४. | डॉक्टर, शेतकरी, शिक्षक, कारागीर यांच्याशी त्यांच्या व्यवसायासंबंधी बोलण्याची संधी देणे. |
| | ५. | उत्स्फूर्तपणे भाषण करण्याची स्पर्धा घेणे. |
| २.४.२ | १. | कविता किंवा गाण्यांच्या ध्वनिफिती ऐकवणे. |
| | २. | गाणी (स्वतंत्रपणे व सामूहिकरीत्या) चालीवर म्हणावयास शिकवणे. |
| | ३. | आशयानुरूप अभिनय व अभिनयगीत शिकवणे. |
| | ४. | पाठांतर स्पर्धा (काव्यगायन, काव्यवाचन स्पर्धा) आयोजित करणे. |
| २.४.३ | १. | प्रत्यक्ष वस्तू पदार्थ दाखवून विद्यार्थ्यांकडून वर्णन करून घेणे. उदा. डाकघर, आरोग्य केंद्र येथील वस्तू, सुधारित शेतीची अवजारे, परिसरातील वस्तू. |
| २.४.४ | १. | इयत्ता चौथीच्या विद्यार्थ्यांची अनुरूप विषयावर चर्चा वर्गात आयोजित करणे. |
| | २. | विविध स्वरूपाचे सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करून वर्गात त्यावर चर्चा |

| अध्ययन क्षमता क्रमांक | | अध्ययन अनुभव / उपक्रम |
|---|---|---|
| | | करणे. उदा. जयंती उत्सव, पुण्यतिथी उत्सव, राष्ट्रीय सण इत्यादी कार्यक्रमांचे नियोजन व कार्यवाहीविषयी चर्चा. |
| | ३. | वर्गसहलीच्या नियोजनावर चर्चा घडवून आणणे. |
| ३.४.१ | १. | शब्द-चित्रमालिका व भित्तिपत्रके वर्गात उपलब्ध करून देणे आणि त्यांचे प्रकट वाचन करून घेणे. |
| | २. | वाचलेल्या मजकुराचा सारांश सांगणे व त्यावर एक-दोन प्रश्न विचारणे. |
| ३.४.२ | १. | वर्गमित्रांच्या हस्तलिखित मजकुराचे वाचन करवून घेणे. |
| | २. | मार्गदर्शनाखाली वर्गात लिहून घेतलेल्या पत्रांचे वाचन करवून घेणे. |
| | ३. | हस्ताक्षरात लिहिलेल्या सूचनांचे वाचन करून विद्यार्थी त्यानुसार कृती करतात का हे पाहणे. |
| ३.४.३ | १. | पाठ्यपुस्तकातील मजकूर तसेच मुलांच्या आवडीची पुस्तके, नियतकालिके व वृत्तपत्रांतून दर आठवड्याला येणाऱ्या बालसाहित्यांतील मजकुराचे वाचन करवून घेणे. |
| | २. | प्रकट वाचन स्पर्धा आयोजित करणे. |
| | ३. | गतीने वाचण्यासाठी मूकवाचनाचा सराव देणे. मजकुरावर आधारित एक-दोन प्रश्न विचारणे. |
| | ४. | नियतकालिकांमधील वाचलेल्या भागाचा आशय कथन करण्यास सांगणे. |
| | ५. | वाचलेल्या मजकुरातील आशयावर प्रश्नोत्तरे घेणे. |
| | ६. | मुलांना वर्गात वाचण्याची सोय होण्यासाठी पुस्तकपेढ्या तयार करणे. तसेच घरी पुस्तके वाचण्याची सुविधा उपलब्ध करून घेणे. |
| ४.४.१ | १. | पाठ्यपुस्तकातील काही निवडक उताऱ्यांचे अनुलेखन करवून घेणे. |
| | २. | लेखन करताना कोणकोणती काळजी घ्यायची याचे मार्गदर्शन करणे. |
| | ३. | सुलेखन वहीमध्ये लेखन करवून घेणे. |
| | ४. | हस्ताक्षर स्पर्धा आयोजित करणे. |
| ४.४.२ | १. | लेखनाचे नियम समजावून देऊन श्रुतलेखन देणे. |
| | २. | लेखनात आढळलेल्या चुका दुरुस्त करून देणे व ते सुधारित स्वरूपात तीन ते पाच वेळा लिहून घेणे. |
| ४.४.३ | १. | निबंधाचा विषय वर्गफलकावर लिहिणे. विषयाबाबत चर्चा करणे, चर्चेतून पुढे आलेले मुद्दे फलकावर लिहिणे. निबंध मांडणी व वाक्य जोडणी समजावून देणे. विरामचिन्हांच्या उपयोगाचा सराव देणे. |
| | २. | मुद्दे देऊन गोष्ट लिहिण्यास सांगणे. |
| | ३. | प्रसंग-चित्रमालेच्या साहाय्याने गोष्ट लिहिण्यास सांगणे. |
| | ४. | कौटुंबिक स्वरूपाच्या पत्रांचे लेखन करवून घेणे. |

| अध्ययन क्षमता क्रमांक | अध्ययन अनुभव / उपक्रम |
| --- | --- |
| ५.४.१ | १. पाठ्यपुस्तकातील वाचलेला मजकूर, ऐकलेली गोष्ट किंवा भाषण, दूरदर्शन, आकाशवाणी, ध्वनिफितीद्वारा ऐकलेला कार्यक्रम यांवर आधारित 'का ?' व 'कसे ?' यांसारखे कार्यकारणभावदर्शक प्रश्न विचारून चर्चा करणे. |
| ५.४.२ | १. पाठ्यपुस्तकातील तसेच वयोगटानुरूप अन्य निवडक मजकूर ऐकवणे किंवा वाचून घेणे. त्यावर आधारित कार्यकारणभावदर्शक प्रश्न विचारून त्यांची 'कारण की', 'म्हणून' या स्वरूपात उत्तरे स्वीकारणे. |
| ६.४.१ | १. पाठ्यपुस्तकाच्या आधारे जोडणी करण्याकरता विविध वाक्यांश असलेली वाक्ये देणे.<br>२. उद्देश्य व विधेय समजावून सांगून ते ओळखण्यास लावणे आणि त्यांचा सराव देणे.<br>३. पाठातील मजकुरात वापरलेल्या नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद या शब्दांच्या जातींचा परिचय करून देऊन त्या ओळखण्याचा सराव देणे.<br>४. मुख्य तीन काळ, लिंग व वचन यांची ओळख करून देऊन त्यांचा वाक्यरचनेत उपयोग करून घेणे.<br>५. लेखनात किंवा भाषणात जरूर तेथे समानार्थी किंवा विरुद्धार्थी शब्दांचा योग्य वापर करण्याबाबत मार्गदर्शन करणे व उपयोग करून घेणे. |
| ७.४.१ | १. शिक्षकाने फळ्यावर वर्णमालेनुसार काही शब्द चित्रासह लिहिणे व कोश पद्धतीनुसार त्यांचा क्रम विद्यार्थ्यांकडून लावून घेणे.<br>२. चित्र-शब्दकोशाचा उपयोग करण्याच्या संधी उपलब्ध करून देणे. |
| ८.४.१ | १. भाषण करताना, बातम्या सांगताना, इतरांशी बोलताना, वर्गमित्रांबरोबर चर्चा करताना, प्रश्नांची तोंडी उत्तरे देताना व्यावहारिक भाषेचा उपयोग करण्यास मुलांना प्रवृत्त करणे. |
| ९.४.१ | १. वाक्प्रचार व म्हणी यांचा विद्यार्थ्यांकडून संग्रह करवून घेणे व त्यांचा उपयोग करावयास सांगणे. समानार्थी व विरुद्धार्थी शब्दांच्या जंत्र्या तयार करून त्यांचे तक्ते वर्गात लावणे.<br>२. शालेय वाचनालयातील मासिके व पुस्तके विद्यार्थ्यांना नियमितपणे उपलब्ध करून देऊन वाचण्यास प्रोत्साहन देणे.<br>३. लेखनात, संभाषणात नवीन शब्दांचा वापर करण्यास विद्यार्थ्यांना प्रेरणा देणे व शब्दांचा वापर करण्याचा सराव देणे. |

# अनुक्रमणिका

# १. झुळूक मी व्हावे



वाटते सानुली मंद झुळुक मी व्हावे
घेईल ओढ मन तिकडे स्वैर झुकावे

कधि बाजारी तर कधी नदीच्या काठी
राईत कधी वा पडक्या वाड्यापाठी.
हळु थबकत जावे कधि कानोसा घेत
कधि रमत गमत वा कधी भरारी थेट.



लावून अंगुली कलिकेला हळुवार
ती फुलुनि बघे तो व्हावे पार पसार.
परि जाता जाता सुगंध संगे न्यावा
तो दिशादिशांतुनि फिरता उधळुनि द्यावा.



गाण्याची चुकलीमुकली गोड लकेर
झुळझूळ झऱ्याची पसरावी चौफेर.
शेतांत पाचुच्या, निळ्या नदीवर शांत
खुलवीत मखमली तरंग जावे गात.

कवी - दा. अ. कारे

२.४.२, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१

**सानुली** - लहानशी, **स्वैर** - मुक्तपणे, मोकळेपणे, **राई** - दाट झाडी, ओळी, रांग, **कानोसा** - अंदाज, **भरारी** - झेप, **अंगुली** - बोट, **कलिका** - कळी, **लकेर** - धुन (गाण्याचे ध्वनी), गाण्यातील तान, **पाचूचे शेत** - पाचू या हिरव्या रंगाच्या रत्नाप्रमाणे दिसणारे हिरवे शेत.

कविता चालीवर म्हणता यावी; म्हणून कवितेत काही शब्दांतील अक्षरे ऱ्हस्व दिली आहेत; परंतु गद्यात लिहिताना ती खालीलप्रमाणे दीर्घ लिहावीत. (९.४.१)
झुळूक, कधी, हळू, हळूवार, फुलुनी, दिशादिशांतुनी, उधळुनी.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) कवीला कोण व्हावेसे वाटते ?
  (२) कवीला सुगंध कोठे उधळून द्यावा असे वाटते ?
  (३) कवी कलिकेची कोणती गंमत करणार आहे ?

- **झुळूक होऊन कोठे कोठे जावे असे कवीला वाटते ? तुमच्या शब्दांत लिहा.** (५.४.२)

- **खालील अर्थ असणाऱ्या कवितेतील ओळी सांगा.** (५.४.१)
  (१) मनाला वाटेल तसे सगळीकडे धावावे.
  (२) वाहणाऱ्या पाण्याचा आवाज सगळीकडे पसरावा.
  (३) कळीला हळूच स्पर्श करावा.

- **झेप, मुक्तपणे, सोबत, बोट, हिरव्या रंगाचे रत्न, सर्वत्र या अर्थाचे कवितेतील शब्द शोधा व लिहा. (९.४.१)**

- **जोड्या लावा.** (९.४.१)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मंद | पडका | गोड | पाचूचे | निळी |
| वाडा | झुळूक | लकेर | नदी | शेत |

- **कवीला मंद झुळूक व्हावेसे वाटते. तुम्हांला कोण व्हावेसे वाटते व काय करावेसे वाटते ? कल्पना करा. दहा वाक्यांत लिहा.** (४.४.३)

- **खालील शब्दांच्या पुढे कंसातील योग्य समूहदर्शक शब्द लिहा.** (९.४.१)
  **(बन, कुंज, जाळी, बेट, ताटवा)**
  (१) करवंदीची  (२) फुलझाडांचा  (३) वेळूंचे
  (४) केवड्याचे  (५) वेलींचा



# २. सांकव



सुलभाची परीक्षा नुकतीच संपली होती. आपल्या आईबरोबर ती आजोळी, कोकणात आली होती.

आजोळी येऊन सुलभाला दोन-तीन दिवस झाले होते. दूरवर पसरलेला समुद्र, आंब्याच्या, नारळी-सुपारीच्या बागा, लालसर दगडांची घरे, लालबुंद माती हे सर्व बघून ती चकित झाली. शेजारच्या सदाशिवशी आणि सुमाशी तिची चांगलीच गट्टी जमली. तिघेजण खूप गप्पा मारायचे, खेळायचे.

एकदा समुद्राच्या किनाऱ्यावर तिघेही फिरायला गेले होते. समुद्र पाहून सुलभा म्हणाली, ''किती स्वच्छ आहे रे हा समुद्रकिनारा !''

किनाऱ्यावर थोडा वेळ थांबून तिघेही फिरत फिरत एका पऱ्ह्याजवळ आले. खळखळ आवाज करणाऱ्या पऱ्ह्यात मुले खूप नाचली. तिथे सदाशिवचे दोन मित्र त्यांना भेटले. पऱ्हा ओलांडण्यासाठी लाकडाचा अरुंद पूल होता. सुलभा थबकली. पुलाकडे पाहतच राहिली.

''घाबरलीस ? पक्का आहे तो सांकव !'' सुमा म्हणाली.

''सांकव म्हणजे काय रे, सदाशिव ?'' सुलभाने विचारले.

''अगं, सांकव म्हणजे पूल. दोन काठांना जोडणारा.'' सदाशिवने सांगितले.

३.४.१, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ७.४.१, ९.४.१



'सांकव... सांकव...' सुलभाने शब्द मनात घोळवला. मुले सांकवावरून पलीकडे गेली. सर्वांबरोबर सुलभाही बिचकत बिचकत सांकवावरून गेली.

सभोवतालच्या दाट झाडीतून येणारे पक्ष्यांचे आवाज सुलभाला नवीन होते.

"आम्ही हे नेहमीच पुस्तकात वाचतो, चित्रात बघतो. सगळं तसंच आहे, सदाशिव !"

"अगं सुलभा, आम्हीपण गाड्या, कारखाने, उंच इमारती चित्रातच बघतो." एव्हाना खूप उशीर झाला होता.

मुलांना भूक लागली. सर्व मुले झाडाखाली बसली. सदाशिवने नाचणीची भाकरी आणि चटणी आणली होती. मित्रांनी भात आणि माशांचे कालवण आणले होते. सुलभाच्या डब्यात पोळीभाजी होती.

नाचणीची भाकरी सुलभाने प्रथमच खाल्ली. तिला ती खूपच आवडली.

मुले परत निघाली. परतीच्या वाटेवर गप्पा रंगात आल्या. सुलभाने आपल्या शहरी जीवनातल्या कितीतरी गमती सांगितल्या. ती शाळेला दुमजली बसमधून जाते, हे ऐकून तर मुलांना खूप आश्चर्य वाटले.

''आमच्याकडे शहरात इमारतीच इमारती असतात. पाच मजली, दहा मजली....'' सुलभा म्हणाली.

''बापरे ! म्हणजे चढाउतरायचा त्रास. दिवस सगळा त्यातच जायचा !'' - सदाशिव.

''नाही रे ! वरच्या मजल्यांवर जायला विजेचा पाळणा असतो. त्यालाच उद्‌वाहक किंवा इंग्रजीत लिफ्ट म्हणतात. आपण फक्त त्यात उभं राहायचं. बटण दाबलं, की पाळणा आपोआप वर जातो. पायऱ्याबियऱ्या चढायच्या नाहीत.'' सुलभा.

सुलभाच्या घराभोवती झाडे नाहीत, हे ऐकून सदाशिवला नवल वाटले.

''अरे सदाशिव, आमच्याकडं असते इमारतींची गर्दी. दुकानांच्या रांगा. दुकानापुढं माणसांच्या रांगा. वाहनांची गर्दी. आम्हांला घरातच खेळावं लागतं. कधी कधी आम्ही बागेत जातो.''

''तुमच्याकडं, शहरात किती गंमत असेल नाही !''

''आपण असं करू या. मी कशी या सुटीत आजोळी आले कोकणात, तसं तुम्ही आमच्याकडं या. शहरातल्या गमतीजमती मी तुम्हांला दाखवीन. माझी शाळाही दाखवीन.''

''वा ! फारच छान ! मी आईला विचारून ठेवतो.''

यावर सदाशिवचा मित्र म्हणाला, ''आम्ही शहर बघितलं नाही.

**शहराकडं आलोही नाही. तू खेडेगाव बघितलं नव्हतंस. आता आपण नेहमी एकमेकांच्या गावाला जायचं बरं का !''**

**'सांकव' या शब्दाचा नवाच अर्थ मुलांना समजत होता.**



**सांकव** - पूल

**गट्टी** - मैत्री

**पऱ्हा** - ओढा

**एव्हाना** - आतापर्यंत, यावेळेपर्यंत

**नाचणी** - एक धान्य प्रकार



## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (५.४.२)
  (१) सुलभा परीक्षा संपल्यावर कोठे गेली ?
  (२) 'सांकव' हा शब्द पहिल्यांदाच ऐकल्यानंतर सुलभाने काय केले ?
  (३) सदाशिवने कशाची भाकरी आणली होती ?
  (४) उंच इमारतीत वरच्या मजल्यावर जाण्यासाठी कशाचा उपयोग करतात ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) सुलभाने कोकणात कोणकोणत्या गोष्टी पाहिल्या ?
  (२) सुलभाने कोकणातील मुलांना शहरातील कोणत्या गमती सांगितल्या ?
  (३) 'सांकव' शब्दाचे कोणते दोन अर्थ या पाठात आले आहेत ?
- **तुमच्या आजोळी तुम्ही पाहिलेल्या गमतीजमती सांगा.** (२.४.३)
- **खालील तक्ता पूर्ण करा.** (५.४.१)

| विशेष | शहर | खेडे |
|---|---|---|
| रस्ते | पक्के | कच्चे |
| हवा | .................. | .................. |
| घरे | .................. | .................. |

- **शहरातील/खेड्यातील गमती-जमती पाच ओळींत लिहा व वर्गात वाचून दाखवा.** (३.४.२, ४.४.३)
- **शहर आणि खेडे येथील जीवनावर आधारित चित्रे जमवून (प्रदर्शन भरवा) वर्गात लावा आणि तुम्हांला माहीत असलेल्या शहरांच्या आणि खेड्यांच्या नावांची यादी वर्णमालेनुसार करा.** (७.४.१)

व्याकरण **:** (६.४.१)

- **खालील वाक्ये वाचा.**

(१) सर्व मुले झाडाखाली बसली.

(२) सुलभा आजोळी कोकणात गेली.

या दोन वाक्यांतील पहिल्या वाक्यात 'सर्व मुलांबद्दल' बोलले गेले आहे. दुसऱ्या वाक्यात 'सुलभाबद्दल' बोलले गेले आहे. प्रत्येक वाक्यात आपण कोणाबद्दल तरी बोलतो म्हणजे विधान करतो. आपण ज्याच्याबद्दल बोलतो त्यास **उद्देश्य** असे म्हणतात.

वरील पहिल्या वाक्यात **'सर्व मुले'** हे उद्देश्य आहे आणि दुसऱ्या वाक्यात **'सुलभा'** हे उद्देश्य आहे.

पहिल्या वाक्यात **'झाडाखाली बसली'** आणि दुसऱ्या वाक्यात **'आजोळी कोकणात गेली'** अशा प्रकारची उद्देश्यांबद्दल माहिती सांगितली आहे. **वाक्यात अशाप्रकारे उद्देश्यांबद्दल जे बोलले जाते म्हणजे विधान केले जाते, त्यास 'विधेय' म्हणतात.**

वरील पहिल्या वाक्यात 'झाडाखाली बसली' हे विधेय आहे आणि दुसऱ्या वाक्यात 'आजोळी कोकणात गेली' हे विधेय आहे.

वरील दोन्ही वाक्यांतील उद्देश्य आणि विधेय पुढील तक्त्यात दर्शवले आहेत. ते काळजीपूर्वक वाचा.

| | कोणाबद्दल बोललो (उद्देश्य) | काय बोललो (विधेय) |
|---|---|---|
| १. | सर्व मुले | झाडाखाली बसली. |
| २. | सुलभा | आजोळी कोकणात गेली. |

- **खालील वाक्यांतील उद्देश्य आणि विधेय वरीलप्रमाणे लिहा.**

(१) पंडित नेहरू भारताचे पंतप्रधान होते.
(२) साने गुरुजी मुलांना गोष्टी सांगत.
(३) साधूने पोपटाला उपदेश केला.
(४) आईने पोळ्या केल्या.
(५) खार झाडावर सरसर चढते.





# ३. मला माझ्या आईचा अभिमान वाटतो

आता जर माझ्या एखाद्या मैत्रिणीनं मला विचारलं, की 'तुझी आई काय करते ?' तर मी नक्कीच अभिमानानं सांगेन, की 'ती एक रस्ता झाडणारी झाडूवाली आहे – सफाई कामगार आहे.' पण काही दिवसांपूर्वी माझ्या आईच्या नोकरीबद्दल कोणी विचारलेलं मला मुळीच आवडत नसे. गेल्याच वर्षी यांग झी आणि मी शाळेत जायला निघालो होतो. आम्ही मजेत गप्पा करत चाललो होतो. अचानक तिनं मला विचारलं, ''तुझी आई कुठं नोकरी करते ?'' या प्रश्नानं मी एकदम सावध झाले आणि प्रश्नाचं उत्तर देण्याच्या ऐवजी मी तिलाच विचारलं, ''तुझी आई काय करते ?'' तिनं अभिमानानं चटकन उत्तर दिलं, ''ती इंजिनीअर आहे.'' ''तुझी ?'' मी थोडा वेळ गोंधळले आणि खालच्या आवाजात हळूच पुटपुटले, ''जाऊ दे ते.''

त्या दिवशी माझं लक्ष कुठेच लागेना. खेळाच्या तासाला मी वर्गातच बसून राहिले. शाळा सुटल्यावर मी घरी आले. मला खूप उदास वाटत होतं. मी आईकडं पाहिलं. ती तशी फार उंच नाहीच. तिचे डोळे पाणीदार आहेत; पण तिचा चेहरा थोडासा कठोर वाटतो. तिच्या डोळ्यांच्या कडांजवळ थोड्या थोड्या सुरकुत्याही उमटू लागल्या आहेत.

मी तिच्याकडे टक लावून बघते आहे, हे आईच्या लक्षात आलं असावं. तिनं मला प्रेमानं विचारलं, ''एवढा कसला विचार करते आहेस मेई बाळ ?'' मी नाराजीच्या स्वरात आईला म्हटलं, ''आई, तू झाडूवाली का झालीस ? माझ्या मैत्रिणी मला तुझ्या

२.४.१, ३.४.१, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१



नोकरीबद्दल विचारतात, तेव्हा त्यांना उत्तर द्यायची हिंमतच होत नाही मला.'' आई एकदम चकित झाली. तिचे डोळे अधिकच विस्फारले गेले. भुवया किंचित उंचावल्या गेल्या. तिनं माझ्याकडे नाराजीचा एक कटाक्ष टाकला आणि म्हणाली, ''तुझे विचार अशा प्रकारचे असतील असं मला कधीच वाटलं नव्हतं ! तुला तुझ्या आईची लाज वाटते ?'' ''नाही आई, तसं नाही. मला तुझी लाज वाटत नाही; पण तू जी नोकरी करतेस, ती काही मानाची समजली जात नाही.'' ''नोकरी ! ही केवळ नोकरी नाही. ही एक सेवा आहे. हे सफाईचं काम केलं नाही, तर आपल्या या शहराची काय अवस्था होईल याची कल्पना तरी करता येईल का ? आम्ही सफाई केली नाही, तर तू आणि तुझ्या मैत्रिणींना कचऱ्याच्या ढिगात राहावं लागेल. आम्ही सफाईचं काम करून स्वतः अस्वच्छ होतो; पण

सारा परिसर स्वच्छ करतो. आम्ही अस्वच्छ होतो; म्हणूनच हजारो लोकांना स्वच्छ जागेत राहता येतं.'' आईच्या बोलण्यात राग होता, दुःख होतं, तळमळ होती आणि स्वाभिमानही होता.

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणेच मी रेल्वेस्टेशनवर गेले. तिथल्याच सफाईच्या कामावर आईची नेमणूक झाली होती. दोन फळवाल्यांचं बोलणं माझ्या कानांवर पडलं. ''ती गॅओबाई मोठी जागरूक असते. तिची नेमणूक इथं आहे तोपर्यंत आपला हा विभाग स्वच्छ आणि नीटनेटका राहणारच !'' ते दोन फळवाले माझ्या आईची स्तुती करत होते.

मी इकडंतिकडं पाहिलं. थोड्याच अंतरावर आई जिना झाडताना मला दिसली. एक मोठा उंच काठीचा झाडू घेऊन आई काळजीपूर्वक झाडत होती. मी आईला मोठ्याने हाक मारणार, एवढ्यात एक घटना घडली –



आई लक्षपूर्वक झाडत होती. त्याच वेळी रुबाबदार पोशाखातला एक तरुण आईच्या जवळून जात होता. त्या तरुणाच्या पँटवर धूळ उडाली. आईनं एकदम चमकून वर पाहिलं आणि ती पटकन म्हणाली, "माफ करा हं." पण तो तरुण एक पाय पुढं घेऊन कमरेवर हात ठेवून रागानं आईला म्हणाला, "हे तुम्ही साफ करून द्यायला पाहिजे."

जराही न कचरता, क्षणाचाही विलंब न लावता, आईनं शांतपणे त्याच्या पँटवरची ती धूळ काळजीपूर्वक पुसून घेतली. त्याबरोबर तो तरुण वरमला. त्याचा चेहरा पडला. त्यानं पाय मागे घेतला. तो शरमून म्हणाला, "राहू द्या, राहू द्या" आणि खजील होऊन तो निघून गेला.

त्या तरुणाचा तो ओशाळलेला चेहरा आणि आईचं त्याच्याशी शांत आणि सभ्य वर्तन मी पाहिलं आणि माझा ऊर भरून आला. आईची उंची मला समजली. या घटनेनं मला माझ्या आईची खरी ओळख पटली.

त्या फळवाल्यांनी माझ्या आईची किंमत ओळखली होती. त्यांना माझ्या आईच्या कामाबद्दल केवढा विश्वास होता ! माझी आई आपल्या दोन नाजूक हातांनी हे आपलं शहर स्वच्छ आणि नीटनेटकं ठेवायला मदत करते. अशी गुणी आई मिळाल्याबद्दल मी तिचा अभिमान नको का बाळगायला ?

त्या दिवसापासून मला कोणीही विचारलं, "तुझी आई कोणती नोकरी करते ?" तर मी त्यांना अगदी अभिमानानं सांगते, "माझी आई सफाई कामगार आहे. रस्ता झाडणारी एक आदर्श झाडूवाली आहे !"

बोलीभाषेत एकारान्त शब्दात मात्रांऐवजी शीर्षबिंदू देतात. उदा. 'तिने मला प्रेमाने विचारले.' हे वाक्य बोलीभाषेत 'तिनं मला प्रेमानं विचारलं.' असे होईल; परंतु या शब्दावरील शीर्षबिंदूचा उच्चार अनुस्वाराप्रमाणे केला जात नाही.



**पुटपुटणे** - तोंडातल्या तोंडात बोलणे
**टक लावून पाहणे** - एकसारखे पाहणे
**कटाक्ष** - डोळ्याच्या कोपऱ्यातून पाहणे
**विलंब** - उशीर
**इंजिनीअर** - अभियंता/ती
**पाणीदार** - तेजस्वी
**चकित होणे** - थक्क होणे
**कचरणे** - घाबरणे
**खजील होणे** - केलेल्या कृत्याची लाज वाटणे



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत लिहा.** (५.४.१, ५.४.२)
  (१) यांग झीच्या प्रश्नाचे उत्तर द्यायचे मेईने का टाळले ?
  (२) मेईला आपल्या आईची खरी ओळख केव्हा पटली ?
  (३) मेईला आपल्या आईचा अभिमान का वाटू लागला ?
- **खालील वाक्ये कोणी व केव्हा म्हटली ते सांगा.** (५.४.१)
  (१) "तुझी आई कुठं नोकरी करते ?"
  (२) "हे तुम्ही साफ करून द्यायला पाहिजे."
  (३) "तुझे विचार अशा प्रकारचे असतील असं मला कधीच वाटलं नव्हतं !"
- **खालील अर्थ सांगण्यासाठी पाठात कोणती वाक्ये आली आहेत ?** (५.४.१)
  (१) मला माझ्या आईचा मोठेपणा समजला.
  (२) फळवाल्याला माझ्या आईचे महत्त्व कळले होते.
- **'मला माझ्या वडिलांचा अभिमान वाटतो' यावर दहा वाक्ये लिहा.** (४.४.३)
- **खालील शब्दांचे विरुद्धार्थी शब्द पाठात आले आहेत ते शोधून लिहा.** (९.४.१)
  बेसावध, अस्वच्छ, निंदा, अविश्वास, असभ्य.
- **तुमच्या गावातील खालीलपैकी एका व्यक्तीची भेट घेऊन माहिती मिळवा.** (२.४.१)
  (१) शेतकरी (२) दुकानदार (३) शिक्षिका (४) शेतमजूर (५) ग्रामसेवक



# ४. हिरकणी



गोपनारी हिरकणी गडा गेली
दूध घालाया, परत झणि निघाली
पायथ्याशी ते वसे तिचे गाव
घरी जाया मन घेइ फार धाव

शिवप्रभुंचा निर्बंध एक होता
तोफ व्हावी अस्तास सूर्य जाता
सर्व दरवाजे अचुक बंद व्हावे
कुठे कोणा जाऊ न येउ द्यावे

सर्व दरवाजे फिरुन परत आली
तिला भेटेना तेथ कुणी वाली
'कोण पाजिल तरी तान्हुल्यास आता ?'
विचारे या बहु दु:ख होय चित्ता

२.४.१, २.४.२, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१




मार्ग सुचला आनंद फार झाला
निघे वेगे मग घरी जावयाला
नसे रक्षक ठेविला जेथ ऐसा
एक होता पथ रायगडी खासा

भला तुटलेला कडा उंच नीट
तळी जाया उतरती पाय वाट
पाय चुकता नेमका मृत्यु येई
परी माता ती, तेथुनीच जाई

उतरु लागे, मन घरी वेधलेले
शुद्ध नाही जरि तनुस लागलेले
अंग खरचटले, वस्त्र फाटलेले
अशा वेषे ती घराप्रती चाले

वृत्त घडले शिवभूपकर्णि जाता
वदे आनंदे 'धन्य धन्य माता !'
कड्यावरती त्या बुरुज बांधियेला
नाव दिधले 'हिरकणी बुरुज' त्याला !

कवी - विनायक

गोपनारी - गवळण
वसणे - राहणे
वाली - रक्षण करणारा, कैवारी
रक्षक - पहारेकरी
पथ - मार्ग, रस्ता
तळी - खाली, तळाला

झणि (णी) - लवकर, झरझर
निर्बंध - नियम, बंधन
चित्त - मन
ऐसा - असा
खासा - विशिष्ट, वेगळा
तनु (नू) - शरीर

**घराप्रति** - घराकडे **वृत्त** - हकिकत, बातमी **भूप** - राजा
**कर्ण** - कान **दिधले** - दिले

'प्रति' म्हणजे 'कडे', 'प्रती' म्हणजे 'प्रत' शब्दाचे अनेकवचन. कवितेत 'घराप्रती' या शब्दात 'ती' हे अक्षर वृत्तनियमनासाठी ऱ्हस्वचे दीर्घ केले आहे.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) हिरकणी गडावर कशासाठी गेली होती ?
  (२) हिरकणीचे गाव कोठे होते ?
  (३) हिरकणी कोणत्या रस्त्याने घरी जायला निघाली ?
  (४) शिवाजीमहाराजांनी कड्यावर बांधलेल्या बुरुजाला कोणते नाव दिले ?

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) गडाच्या बाबतीत शिवप्रभूंचा कोणता नियम होता ?
  (२) हिरकणी का दुःखी झाली ?
  (३) हिरकणीने तुटलेल्या कड्याच्या मार्गाने जायचे का ठरवले ?
  (४) कड्यावरून उतरताना हिरकणीला कोणता त्रास झाला ?

- **खाली काही विधाने दिली आहेत. त्याखाली दिलेल्या पर्यायांपैकी सर्वांत योग्य पर्यायापुढे ✓ अशी खूण करा.** (५.४.२)

  **(१) हिरकणी गडावरील मुख्य दरवाजातून खाली येऊ शकली नाही; कारण –**
  (१) ती वाट चुकली होती.
  (२) तिला पहारेकऱ्याची भीती वाटत होती.
  (३) सर्व दरवाजे बंद झाले होते.

  **(२) कडा उतरत असताना हिरकणीच्या अंगाला खरचटले; कारण –**
  (१) कड्याचा मार्ग बिकट होता.
  (२) तिचे लक्ष घरी लागले होते.
  (३) ती घाईघाईने खाली उतरत होती.

(३) शिवप्रभूंनी हिरकणीबद्दल 'धन्य धन्य माता' असे उद्गार काढले; कारण –

(१) हिरकणी अवघड मार्गाने गडावरून उतरली होती.

(२) मुलाच्या प्रेमापोटी हिरकणीने धाडस केले होते.

(३) आतापर्यंत कोणीही न उतरलेल्या कड्यावरून हिरकणी उतरली होती.

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)

| | |
|---|---|
| धाव घेणे | निर्बंध असणे |
| वाली भेटणे | मार्ग सापडणे |

- **समानार्थी शब्द सांगा.** (६.४.१, ९.४.१)

| | |
|---|---|
| नारी | मृत्यू |
| तनू | कर्ण |
| भूप | बहू |

- **विरुद्ध अर्थाचे शब्द सांगा.** (६.४.१)

| | |
|---|---|
| अस्त | अचूक |
| बंद | दुःख |

- **आई मुलासाठी कोणकोणती कामे करते ? याच्या नोंदी करा व सांगा.** (२.४.१)

- **'हिरकणी'च्या जीवनातील हा प्रसंग दहा वाक्यांत लिहा.** (४.४.३)

- हे शब्द असेच लिहा. (९.४.१)
झणी, अचूक, येऊ, बहू, मृत्यू, वेष.

□□□

# ५. क्रांतिकारक चंद्रशेखर आझाद



एके दिवशी 'भारत माता की जय !', 'महात्मा गांधी की जय !' अशा घोषणा ऐकताच एक मुलगा गर्दीत घुसला. स्वतःही घोषणा देऊ लागला. या मुलाला घोषणा देताना पाहून इंग्रज शिपायांचे पित्त खवळले. एका शिपायाने त्याच्या थोबाडीत भडकावली आणि त्याच्या हातात बेड्या घातल्या. तरीही तो डगमगला नाही. त्याला इंग्रज न्यायाधीशापुढे उभे करण्यात आले. न्यायाधीशाने त्याला विचारले, ''तुझं नाव काय ?''

त्याने ताडकन् उत्तर दिले, ''आझाद.''

''तुझ्या वडिलांचं नाव काय ?''

३.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ८.४.१, ९.४.१

तेवढ्याच तडफेने तो उत्तरला, ‘‘परमेश्वर.’’

इंग्रज न्यायाधीश त्याच्या उत्तराने संतापला. त्याने चिडून मुलाला तुरुंगवासाची शिक्षा तर दिलीच; पण त्याचबरोबर त्याला वेताचे बारा फटके मारण्याचीही शिक्षा फर्मावली. ज्याचा अपराध खूप मोठा असतो, जो तुरुंगाचे नियम तोडतो त्यालाच वेत मारण्याची शिक्षा दिली जात असे. या मुलाने अशा प्रकारचा कोणताच अपराध केला नसताना त्याला ही शिक्षा दिली गेली.

एवढ्या लहान मुलाला वेताचे फटके द्यावेत की नाही, याचा विचार तुरुंग अधिकाऱ्यांनी केला नाही. त्यांना फक्त हुकमाचे पालन करायचे होते आणि आपण इंग्रज सरकारचे इमानी सेवक आहोत, हे दाखवून द्यायचे होते. शेवटी ठरलेल्या वेळी त्या मुलाला वेताचे फटके मारण्यात आले; पण त्या मुलाने फटके खाताना डोळ्यांतून एक थेंबही काढला नाही. उलट ‘महात्मा गांधी की जय’, ‘भारत माता की जय’ अशा घोषणा देत तो फटके खात होता. बारा फटके खाल्ल्यानंतर मात्र त्याची शुद्ध हरपली.

शिक्षेनंतर सरकारने त्या मुलाला सोडून दिले. त्याच्या सन्मानार्थ बनारसमध्ये एक प्रचंड सभा झाली. लाखो लोक सभेला हजर होते. हा मुलगा म्हणजेच चंद्रशेखर आझाद होय.

चंद्रशेखर आझाद पुढे क्रांतिकारकांचे नेते बनले. त्यांनी ‘क्रांतिकारी दला’ची स्थापना केली. या दलाचे नाव ऐकताच इंग्रज सरकारला धडकी भरत असे.

क्रांतिकारी दलातील लोक चंद्रशेखर आझादांना ‘आझाद भैया’ किंवा ‘पंडितजी’ या नावाने ओळखत असत. जेव्हा कोणी आझादांना विचारत, ‘‘इंग्रज सरकारला उलथून पाडण्याची, इंग्रजांची हत्या करण्याची खटपट तुम्ही का करता ?’’ तेव्हा आझाद आपल्या



पाठीवरचे व्रण दाखवून त्यांना सांगत, ''हे व्रण मला इंग्रजांचं शासन उखडून टाकण्याचा हुकूम देतात.''

चंद्रशेखरांच्या क्रांतिकारी दलाने अनेक साहसी कृत्ये केली. एकदा एका पोलिसाने चंद्रशेखरांचा पाठलाग केला. ते पोलिसांच्या हाती सापडणारच होते. सुटकेचा दुसरा उपाय नसल्याने त्यांनी आपले पिस्तुल काढले आणि ते पोलिसावर रोखून म्हणाले, ''हिंमत असेल तर पुढे ये ! तू तुझं काम कर ! मी माझं काम करतो.'' पोलीस थबकला आणि तेवढ्यात चंद्रशेखर निसटले. पोलिसांना हुलकावणी देण्यात ते पटाईत होते.

एकदा तर चंद्रशेखर आझाद झाशीच्या पोलीस ऑफिसरचे ड्रायव्हर बनले. त्यांना कोणीच ओळखू शकले नाही. दिवसा ते

आपल्या कामावर हजर राहत आणि रात्री जंगलात जाऊन नेमबाजीचा अभ्यास करत !

चंद्रशेखर आझाद यांना अटक करण्याकरता पोलिसांनी हजारो रुपयांचे बक्षीस जाहीर केले; पण ते सापडले नाहीत. एकदा अलाहाबादमध्ये आल्फ्रेड पार्कमध्ये ते बसले होते. एका भारतीय माणसानेच फितुरी केली. त्याने पोलिसांना बातमी दिली. पोलिसांच्या संपूर्ण तुकडीने बागेला वेढा दिला आणि पोलीस आझादांवर गोळ्या झाडू लागले. आझाद एका झाडाआड उभे राहून गोळ्या झाडत प्रतिकार करत होते; परंतु एकट्याने प्रतिकार करणे अशक्य आहे हे त्यांना कळून चुकले. ते पळूही शकत नव्हते. त्यांच्या जांघेत गोळी घुसली होती. जिवंतपणी पोलिसांच्या हाती सापडू नये म्हणून त्यांनी स्वतःच्या हाताने स्वतःवर गोळ्या झाडून घेतल्या आणि आपल्या आयुष्याचा शेवट करून घेतला. मृत्यूनंतरही त्यांच्या निर्जीव शरीरावर गोळ्यांचा वर्षाव चालला होता. पोलिसांना त्यांच्याजवळ जाण्याची हिंमत होत नव्हती.

चंद्रशेखर आझाद वीरपुरुष होते. स्वतंत्र होते. स्वातंत्र्याकरता पोलिसांच्या संपूर्ण तुकडीबरोबर त्यांनी एकट्यानेच झुंज दिली आणि लढता लढता मरणाला मिठी मारली.

लेखक - अक्षयकुमार जैन अनुवाद - वंदना विटणकर



क्रांतिकारक - चांगला बदल घडवून आणण्यासाठी प्रयत्न करणारा
पित्त खवळणे - संतापणे, खूप रागावणे
तडफेने - ताडकन
इमानी - प्रामाणिक
व्रण - जखमेची खूण
साहसी - धाडसी
फितुरी करणे - गुप्त माहिती शत्रूला पुरवणे
प्रतिकार करणे - विरोध करणे



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.२)
  (१) शिपायाचे पित्त का खवळले ?
  (२) इंग्रज न्यायाधीश का रागावला ?
  (३) इंग्रज न्यायाधीशाने मुलाला कोणती शिक्षा फर्मावली ?
  (४) वेताचे फटके खाताना मुलाने कोणत्या घोषणा दिल्या ?

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) चंद्रशेखर आझादाने इंग्रज न्यायाधीशाच्या प्रश्नांना कोणती उत्तरे दिली ?
  (२) चंद्रशेखर आझादांनी पोलिसाच्या पाठलागापासून सुटका करून घेण्यासाठी कोणती युक्ती केली ?
  (३) चंद्रशेखर आझाद यांनी मृत्यूचा स्वीकार कसा केला ?

- **रिकाम्या जागा भरा.** (५.४.१)
  (१) चंद्रशेखर आझाद यांनी .................... स्थापना केली.
  (२) हे .............. मला इंग्रजांचे शासन उखडून टाकण्याचा हुकूम देत आहेत.
  (३) त्या मुलाने .............. खाताना डोळ्यांतून एक थेंबही काढला नाही.

- **शब्दसमूह आणि त्यांचा अर्थ यांच्या जोड्या जुळवा.** (९.४.१)

| | | |
|---|---|---|
| (१) शुद्ध हरपणे | – | विश्वासघात करणे |
| (२) फितुरी करणे | – | नष्ट करणे |
| (३) उलथून पाडणे | – | बेशुद्ध होणे |
| (४) धडकी भरणे | – | चकवणे |
| (५) हुलकावणी देणे | – | भीती वाटणे |

- **कोण, कोणास म्हणाले ते लिहा.** (५.४.१)
  (१) "तुझ्या वडिलांचं नाव काय ?"
  (२) "इंग्रज सरकारला उलथून पाडण्याची खटपट तुम्ही का करता ?"
  (३) "तू तुझं काम कर ! मी माझं काम करतो."

- **या पाठात अनेक प्रसंग आले आहेत. त्यांतील कोणता प्रसंग तुमच्या मनावर ठसला, ते वर्गात सांगा.** (८.४.१)

- **'चंद्रशेखरांचा ठावठिकाणा सांगणारा फितूर तुम्हांला भेटला, तर तुम्ही त्याला काय म्हणाल ?' ते वर्गासमोर सांगा.** (५.४.१)

व्याकरण : (६.४.१)

- **खालील परिच्छेद वाचा.**

एवढ्या लहान **मुलाला वेताचे फटके** द्यावेत की नाही, याचा विचार **तुरुंग अधिकाऱ्यांनी** केला नाही. त्यांना फक्त **हुकमाचं** पालन करायचं होतं आणि आपण **इंग्रज सरकारचे** इमानी **सेवक** आहोत, हे दाखवून द्यायचं होतं. शेवटी ठरलेल्या वेळी त्या **मुलाला** वेताचे फटके मारण्यात आले. तो मुलगा म्हणजेच **चंद्रशेखर आझाद** होय. फटके खाताना त्याने **दुःखाचे** उद्‌गारही काढले नाहीत.

वरील उताऱ्यातील जाड ठशांतील शब्द पाहा. हे शब्द म्हणजे कोणाची तरी किंवा कशाची तरी ती नावे आहेत. अशाप्रकारे व्यक्ती, वस्तू, ठिकाण, देश, गुण, भाव इत्यादींच्या नावांना नामे म्हणतात.

वरील परिच्छेदात मुलगा, वेत, फटका, तुरुंग, अधिकारी, हुकूम, इंग्रज, सरकार, सेवक, चंद्रशेखर, दुःख ही **नामे** आहेत.

- **खालील वाक्यांतील नामे ओळखा.**

(१) चंद्रशेखर आझाद वीरपुरुष होते.
(२) पोलिसांच्या तुकडीने बागेला वेढा दिला.
(३) सूर्यास्त झाल्यावर हळूहळू अंधार पडू लागतो.
(४) माणसाच्या अंगी धीटपणा असावा.
(५) लांडगा हा जंगली प्राणी आहे.
(६) हळद पिवळ्या रंगाची असते.



# ६. देवगिरी

औरंगाबादहून आपण वेरूळच्या लेण्यांकडे जायला निघालो, की वाटेतच दौलताबाद लागते. ही वाट किती नागमोडी वळणाची आहे !



हा समोर किल्ला पाहा. तो किती उंचीवर आहे, पाहिलात ? खरं म्हणजे हा किल्ला मुळी बांधलेला नसून या प्रचंड काळ्या डोंगराच्या पोटात जणू तो कोरलेलाच असावा असं वाटतं. पुढे जसजसे या ठिकाणी राजे-महाराजे आले तसतसे त्यांनी या किल्ल्याच्या संरक्षणासाठी तटबंदी अधिक भक्कम केली.

दौलताबादचे जुने नाव होते 'देवगिरी'.

३.४.३, ४.४.३, ५.४.१, ९.४.१

आता या किल्ल्याकडे पाहा. अनेक राजे, अनेक लढाया या किल्ल्याने पाहिल्या. बरीच पडझड होऊनही हा किल्ला आजही चांगल्या स्थितीत आहे.

हा पाहा तटाचा पडलेला भाग. तटाची भिंत तेरा फूट रुंद आहे ! हा सर्वांत बाहेरचा तट किती लांब असेल बरे ? तब्बल तीन मैल ! (सुमारे ४.५० किमी) असे तीन तट येथे आहेत. बारकोट, मारकोट आणि काळकोट. या किल्ल्याला साधारणत: ३० फूट उंचीच्या वेशी आहेत. या प्रचंड वेशीतून अंबारीसह हत्ती सहज जाईल. वेशींची ती प्रचंड महाद्वारे पाहिलीत ना ? त्यापैकी एकाचे नाव मक्का दरवाजा व दुसऱ्याचे नाव रोझा दरवाजा अशी त्यांची नावे आहेत. या महाद्वारावरील लोखंडाच्या जाड पत्र्यांवर मोठमोठे अणकुचीदार खिळे ठोकले आहेत. शत्रूच्या हत्तींनी धडक मारली, तर दार उघडू नये म्हणून ही सोय ! रात्री ही महाद्वारे आतून बंद करायची. भले मोठे आगळ सरकवून जाडजूड लोखंडी साखळदंड अडकवला की संपूर्ण किल्ला पोलादी पेटीत ठेवल्याप्रमाणे बंद !

वेशीच्या पलीकडे जो उंचच उंच मनोरा दिसतो आहे ना, त्याचे नाव आहे चांदमिनार.

हा जुना नगारखाना. येथे दररोज चौघडा वाजत असे. कालिकादेवीचे देऊळही जवळच आहे. ते पाहिल्यावर प्राचीन काळाची आठवण येते. पलीकडे तो हौद दिसतो आहे ना, त्याचे नाव आहे हत्तीहौद. हत्तींना पाणी पिण्यासाठी, डुंबण्यासाठी हा प्रचंड हौद बांधला असे म्हणतात.

हा चिनी महाल. एके काळी ही इमारत अत्यंत भव्य व सुंदर होती. आता ती बरीच पडली आहे. येथूनच ती पाहा बारादरी, त्या धान्याच्या कोठ्या आणि दारूगोळ्याची कोठारे ! आता चढण

चढू या. चढण हळूहळू अवघड होते आहे, नाही का ? खाली पाहा. खालची माणसे किती लहान दिसत आहेत, नाही ? अगदी मुंग्यांसारखी ! हां, थांबा, आता आपण या बोळाच्या तोंडाशी आलो. येथून आत भुयारी रस्ता असेल असे वाटलेदेखील नव्हते, नाही का आपल्याला ? ही अंधारी वाट आहे बरे ! जपून या. कुणी भिऊ नका. माझ्या मागे या. बॅटरी (विजेरी) आहे मजजवळ, तिच्या प्रकाशात चालत या. या अंधाऱ्या वाटेला लागून जे दोन रस्ते दिसताहेत ना, त्या फसव्या वाटा आहेत. शत्रू चुकून या वाटेने आलेच, तर त्यांचा सरळ कडेलोट होईल ! घाबरू नका. आता या वाटा आतून बंद केलेल्या आहेत.

आता भुयार संपले. जिन्याच्या वरच्या बाजूला लोखंडी पत्रा उभा करून ठेवलेला आहे ना, त्याला 'तवा' म्हणतात. चुकूनमाकून शत्रू फसव्या वाटा चुकवून इथे आलाच, तर या भुयाराच्या तोंडावर हा तवा ठेवत आणि त्यावर खूप विस्तव पेटवत. त्यामुळे शत्रूला वर येता येत नसे व तो भुयारातच गुदमरून जाई.

भुयाराची लांबलचक वाट चालून आल्यावर किती दमल्यासारखे वाटते नाही ? थोडे थांबा. ही पाहा तोफ. हिचे तोंड मेंढ्यासारखे आहे, म्हणून हिला मेंढातोफ म्हणतात. ती पलीकडे दोन टाकी दिसताहेत. त्यांची नावे आहेत कवडी टाके आणि मोती टाके. मोठ्या थोरल्या खडकाच्या आत थंड आणि स्वच्छ अशा पाण्याचा साठा आहे तिथे. पाण्याची खोली पाहूनच छाती दडपते; या टाक्यांचे पाणी मात्र गोड आणि थंडगार आहे. पोटभर पाणी प्यायल्यावर किती ताजेतवाने झाल्यासारखे वाटते !

समोर पादुका आहेत ना, त्या जनार्दनस्वामींच्या आहेत. ते संत एकनाथांचे गुरू होते. जनार्दनस्वामींची समाधीही येथेच आहे

आणि पलीकडे जे इटुकले गाव दिसते तेच दौलताबाद. एकेकाळचे राजधानीचे वैभव आज लोपले आहे; मात्र 'देवगिरी'चा किल्ला आजही त्या प्राचीन वैभवाची साक्ष देत उभा आहे.

लेखक - न. शे. पोहनेरकर



**लेणे** - गुहेतील दगडावर कोरलेल्या मूर्ती, नक्षी, चित्रे, **नागमोडी** - वळणावळणाची, **तटबंदी** - संरक्षणासाठी किल्ल्याभोवती बांधलेली मजबूत भिंत, **महाद्‍वारे** - मोठे दरवाजे, **आगळ** - अडसर, **अणकुचीदार** - अतिशय टोकदार, **नगारखाना** - चौघडा, नगारा इत्यादी वाद्ये ठेवण्याचे ठिकाण, **चौघडा** - एक वाद्य, **डुंबणे** - पोहणे, **महाल** - राजवाडा, **बारादरी** - बारा दारे असलेली इमारत, **लोपणे** - दिसेनासे होणे, नष्ट होणे.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) देवगिरीच्या किल्ल्यावर तटबंदी अधिक भक्कम का केली ?
  (२) चांदमिनार हे कशाचे नाव आहे ?
  (३) किल्ल्यातील हौदाला हत्तीहौद असे नाव का दिले ?

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन-तीन वाक्यांत उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) देवगिरी किल्ल्याची पडझड का झाली आहे ?
  (२) महाद्‍वाराच्या भक्कमपणासाठी कोणत्या गोष्टी केल्या आहेत ?
  (३) देवगिरी किल्ल्यावर कोणकोणती बांधकामे होती ?
  (४) 'देवगिरीचा किल्ला आजही त्या प्राचीन वैभवाची साक्ष देत उभा आहे,' असे का म्हटले आहे ?

- **गाळलेल्या जागी कंसातील योग्य शब्द भरा.** (५.४.१)
**(कवडी, मोती, दौलताबाद, फसव्या, तवा, जनार्दन)**
(१) ............ चे जुने नाव 'देवगिरी' होते.
(२) जिन्याच्या वरच्या बाजूला लोखंडी पत्रा आहे, त्याला ............ म्हणतात.
(३) देवगिरी किल्ल्यावर ............ टाके आणि ............ टाके या दोन टाक्या आहेत.
(४) गडावर ............ स्वामींची समाधी आहे.
(५) अंधाऱ्या वाटेला लागून असणाऱ्या दोन वाटा ............ आहेत.

- **अर्थ समजून घेऊन वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)
छाती दडपणे, ताजेतवाने वाटणे, कडेलोट होणे.

- **विरुद्‌ध अर्थाचे शब्द सांगा.** (९.४.१)
प्रचंड, सोय, दररोज, चढण, प्राचीन.

- **योग्य जोड्या लावा.** (५.४.१)

| अ | ब |
|---|---|
| दौलताबाद | उंच मनोरा |
| काळकोट | महाद्‌वार |
| प्रचंड | एकनाथांचे गुरू |
| चांदमिनार | एक तट |
| जनार्दनस्वामी | देवगिरी |

- **या पाठात किल्ल्यांविषयी आलेल्या शब्दांची यादी तयार करा.** (९.४.१)
- **तुम्हाला माहीत असलेल्या पाच किल्ल्यांची नावे सांगा.** (९.४.१)
- **तुमच्या परिसरात एखादा किल्ला किंवा लेणे असल्यास तिथे जाऊन पाहा. त्याची माहिती पंधरा वाक्यांत लिहा.** (४.४.३)



# ७. पोपटपंची

खूप खूप वर्षांपूर्वीची गोष्ट. एकदा एक साधू आपल्या कुटीत ध्यानधारणा करत होते. तेथे अचानक एक पोपट भयभीत होऊन आला आणि साधूंच्या मांडीवर येऊन बसला. थोड्या वेळाने साधूमहाराजांनी डोळे उघडून पाहिले, तर मांडीवर पोपट बसलेला ! पोपट भीतीने थरथर कापत होता. शिकाऱ्याच्या तावडीतून कसाबसा सुटून तो साधूंपर्यंत येऊन पोचला होता. साधूंनी त्याला अभय दिले. ते त्याची फार काळजी घेऊ लागले. गोड गोड फळे त्याला खायला देऊ लागले; पण त्यांना पोपटाची नेहमी चिंता वाटे, की हा जंगलात गेला आणि पूर्वीसारखाच एखाद्या शिकाऱ्याच्या जाळ्यात सापडला तर !

साधूमहाराजांनी पोपटाला बोलायला शिकवले. मधुर भाषणाने पोपट साधूंची करमणूक करू लागला. साधूंनी पोपटाला एक धडा



२.४.४, ३.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१

पाठ करायला लावला. तो धडा असा होता — 'जंगलात शिकारी येतात, जाळे टाकतात, दाण्यांची लालूच दाखवतात आणि आपल्याला जाळ्यात अडकवतात. आपण सावध राहिले पाहिजे !'

पोपट सगळा धडा बिनचूक म्हणू लागला. पुढे पुढे पोपटाने बाकीचे सगळे बोलणे सोडून दिले, दिवसभर तो एकच धडा घोकू लागला. स्वत:च्या बचावाचा धडा त्याने लक्षात ठेवला; म्हणून साधूंना बरे वाटे.

एकदा साधूंनी पोपटाची परीक्षा पाहायचे ठरवले. प्रत्यक्ष प्रसंग पडल्यावर पोपटाला घोकलेल्या धड्याची आठवण राहील का ? तो सावधगिरीने वागून स्वत:ची सुटका करील का ? की या धड्याची केवळ पोपटपंचीच करील ? हे साधूंना पाहायचे होते.

साधू पोपटाला जंगलात सोडून आले. काही दिवसांनी साधू परत जंगलात गेले. हिंडता-हिंडता त्यांना तो पोपट दिसला. 'जंगलात शिकारी येतात. जाळे टाकतात, दाण्याची लालूच दाखवतात आणि आपल्याला जाळ्यात अडकवतात. आपण सावध राहिले पाहिजे !' हा पाठ तो घोकत होता. साधूंना हे ऐकून आनंद झाला. पोपटास धडा पाठ होता, इतकेच नाही तर जंगलातील सगळ्याच पोपटांनी तो धडा पाठ केला होता.

एवढ्यात साधूंना जंगलात एक शिकारी दिसला. त्यांनी त्याला विचारले, "तुला मी माझ्या आश्रमातील काही फळे देतो. माझे एक काम करशील ?" शिकारी म्हणाला, "हो" साधूंनी शिकाऱ्याला काही फळे दिली आणि सांगितले, "त्या झाडाकडे जा आणि जाळे टाकून बघ, किती पोपट जाळ्यात सापडतात ते. जेवढे सापडतील, तेवढे मला दे." शिकारी कबूल झाला. पोपटांच्या दिशेने जाताजाता शिकाऱ्याला पोपटांची घोकंपट्टी ऐकू आली. त्याला आश्चर्य वाटले, 'मी शिकारी आहे, जाळे

टाकणार, दाणे फेकणार आणि त्यांना जाळ्यात पकडणार हे पोपटांना कसं कळलं ? त्यांनी मला कसं ओळखलं ? आता हे पोपट आपल्या जाळ्यात कसले सापडणार !' असे वाटून शिकारी साधूंकडे परत गेला.

साधू म्हणाले, ''असा निराश होऊ नकोस. पोपटांची परीक्षा बघण्याकरताच तुला मी पाठवलं होतं. तोंडानं बोलतात त्या शब्दांचा अर्थ त्यांना समजतो का, त्याप्रमाणे सावधगिरीनं ते आचरण करतात का, हेच मला बघायचं आहे. तू पुन्हा जाऊन जाळं टाक.''

शिकारी पुन्हा गेला, जाळे पसरले, दाणे टाकले आणि बाजूला जाऊन बसला. थोड्या वेळाने जंगलातले पोपट दाणे खायला उतरले आणि जाळ्यात अडकले. त्यांत साधूंचा पोपटसुद्धा होता ! साधूंना हे पाहून वाईट वाटले. ते पोपटाजवळ



गेले आणि म्हणाले, ‘‘बाबा रे, मी तुला एवढा उपदेश केला, तो तू विसरलास कसा ?’’

पोपट म्हणाला, ‘‘महाराज, मी तुमचा उपदेश विसरलो नाही. सगळा तोंडपाठ आहे. ऐका.’’

तेव्हा साधू म्हणाले, ‘‘अरे वेड्या, नुसता घोकण्यासाठी मी तुला तो उपदेश केला नव्हता. त्याप्रमाणे वागून स्वत:चा जीव तुला वाचवता यावा; म्हणून केला होता.’’ हे ऐकून पोपटाला धड्याचा खरा अर्थ समजला. ‘‘यापुढे मी नुसती पोपटपंची करणार नाही. अर्थ समजून घेईन व त्याप्रमाणे वागेन,’’ असे त्याने साधूंना वचन दिले. हे ऐकून साधूंना समाधान वाटले.

लेखिका - जान्हवी यदुनाथ



**पोपटपंची** - अर्थ न समजता केलेले पाठांतर, घोकंपट्टी, **कुटी** - झोपडी, **ध्यानधारणा** - चिंतन, **अभय** - सुरक्षितपणाची खात्री, **मधुर** - गोड, **लालूच** - लोभ, आमिष, **आचरण** - वागणे, वर्तन.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) भयभीत झालेला पोपट कोठे जाऊन बसला ?
  (२) पोपट साधूमहाराजांची करमणूक कशाप्रकारे करत असे ?
  (३) साधूंना पोपटाच्या कोणत्या गोष्टीचे वाईट वाटले ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) साधूंनी पोपटाला कोणता धडा शिकवला ?
  (२) साधूंनी पोपटाची परीक्षा कशी घेतली ?
  (३) पोपटाने साधूंना कोणते वचन दिले ?
  (४) साधूंनी पोपटाला उपदेश कशासाठी केला होता ?

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा.** (५.४.१)
  (१) ''असा निराश होऊ नकोस.''
  (२) ''बाबा रे, मी तुला एवढा उपदेश केला, तो तू विसरलास कसा ?''
  (३) ''यापुढे मी नुसती पोपटपंची करणार नाही.''

- **का ते सांगा.** (५.४.२)
  (१) साधूंना पोपटाची चिंता वाटे.
  (२) काही दिवसांनी साधू परत जंगलात गेले.
  (३) शिकारी निराश होऊन परत आला.

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)
  तावडीतून सुटणे, अभय देणे, लालूच दाखवणे, घोकंपट्टी करणे, पोपटपंची करणे.

- **शाळेत गुरुजींनी केलेल्या आणि घरात आईने केलेल्या उपदेशांची नोंद करा. यांपैकी कोणता उपदेश तुम्हांला विशेष आवडला, यावर वर्गात मित्रांशी चर्चा करा.** (२.४.४)

**व्याकरण :** (६.४.१)

- **खालील वाक्ये वाचा.**
  (१) पोपट भीतीने थरथर कापत होता. शिकाऱ्याच्या तावडीतून सुटून **तो** कसाबसा साधूपर्यंत आला होता.
  (२) पोपट सगळा धडा बिनचूक म्हणू लागला. हळूहळू **त्याने** बाकीचे सगळे बोलणे सोडून दिले.
  (३) एवढ्यात साधूंना एक शिकारी दिसला. **त्यांनी त्याला** थांबवले.
  (४) थोड्या वेळाने जंगलातले पोपट खाली उतरले आणि **ते** दाणे टिपायला लागले.

वरील वाक्यांतील 'तो, त्याने, त्यांनी, त्याला, ते' हे ठळक अक्षरांतील शब्द पाहा. हे शब्द त्या त्या वाक्यातील नामाबद्दल आले आहेत.

कोणत्या नामाबद्दल कोणता शब्द आला आहे, ते पाहा.

| नाम | नामाबद्दल आलेला शब्द |
|---|---|
| १. पोपट | तो |
| २. पोपटाने | त्याने |
| ३. साधूंनी | त्यांनी |
| ४. शिकाऱ्याला | त्याला |
| ५. पोपट (अनेक) | ते |

अशाप्रकारे नामाबद्दल येणाऱ्या शब्दास सर्वनाम म्हणतात. वरील वाक्यांतील 'तो, त्याने, त्यांनी, त्याला, ते' ही सर्वनामे आहेत. याशिवाय आणखी काही सर्वनामे खाली दिली आहेत.

मी, आम्ही, आपण, तू, तुम्ही, ते, ती, त्या, हे, ही, ह्या, जो – तो.

■ **खालील परिच्छेदातील सर्वनामे शोधून ती कोणत्या नामाबद्दल आली आहेत ते सांगा.**

'आई लक्षपूर्वक रस्ता झाडत होती. त्याच वेळी रुबाबदार पोशाखातला एक तरुण तिच्या जवळून जात होता. त्याच्या पँटवर धूळ उडाली. आईने वर पाहिले आणि ती पटकन म्हणाली, "माफ करा हं." पण तो रागावून म्हणाला, "हे तुम्ही साफ करून द्या."

■ **खालील वाक्यांत मोकळ्या जागी योग्य ती सर्वनामे वापरा.**

(१) माझी सायकल .............. जपून वापरतो. मला .............. मामांनी दिली आहे.

(२) .............. दररोज वेळेवर शाळेत जातो.

(३) अरे हरीश, .............. खेळू या का ?

(४) माझ्या वर्गात चाळीस विद्यार्थी आहेत. .............. सर्वजण खूप अभ्यास करतो.

(५) .............. नियमित अभ्यास करील, .............. परीक्षेत उत्तम यश मिळवील.

# ८. धरत्रीले दंडवत



काया काया शेतामंधी
घाम जिरव जिरव
तेव्हा उगल उगल
कायामधून हिरवं ।



येता पीकाले बहार
शेताशेतात हिर्वय
कसं पिकलं रे सोनं
हिर्व्यामधून पिवयं ।

अशी धरत्रीची माया
अरे, तीले नही सीमा
दुनियाचे सर्वे पोटं
तिच्यामधी झाले जमा ।

शेतामंधी भाऊराया
आला पीकं गोंजारत
हात जोडीसन केला
धरत्रीले दंडवत ।

शेतामंधी भाऊराया
खाले वाकला वाकला
त्यानं आपल्या कपायी
टिया मातीचा लावला ।

२.४.२, २.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१

अशी भाग्यवंत माय
भाऊरायाची जमीन
वाडवडीलाचं देवा,
राखी ठेव रे वतन ।

कवयित्री - बहिणाबाई चौधरी



**धरत्री** - धरित्री, धरती, जमीन, **हिरवं** - (हिरवे) पीक, **हिर्वय** - (हिरवळ) हिरवेगार, **पिवयं** - पिवळे, **दुनिया** - जग, **जोडीसन** - जोडून, **दंडवत** - नमस्कार, **खाले** - खाली, **कपायी** - कपाळी, **टिया** - टिळा, **वतन** - इनाम म्हणून वंशपरंपरागत मिळालेली जमीन.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.२)
  (१) काळ्या मातीतून हिरवे केव्हा उगवेल ?
  (२) भाऊराया जमिनीला नमस्कार का करतो ?
  (३) भाऊराया कपाळाला कशाचा टिळा लावतो ?
  (४) 'भाग्यवंत माय' असे कोणाला म्हटले आहे ?

- **खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.** (५.४.२)
  (१) 'हिरव्यामधून सोनं पिकलं' असे का म्हटले आहे ?
  (२) आपल्या भावाबद्दल कवयित्री काय सांगते ?
  (३) 'धरत्रीच्या मायेला सीमा नाही' असे का वाटते ?

- **खालील अर्थाच्या कवितेत आलेल्या ओळी लिहा.** (५.४.१)
  (१) जमिनीतून पीक वर येईल –
  (२) शेतात खूप पीक येईल –

- **या कवितेतील कोणकोणत्या शब्दांमध्ये 'ळ' ऐवजी 'य' वापरले आहे, ते शब्द सांगा.** (९.४.१)

- **खाली दिलेल्या शब्दांऐवजी कोणते शब्द कवितेत आलेले आहेत, ते शोधा व लिहा.** (९.४.१)

  शेतामध्ये, उगवेल, पिकाला, तिला, नाही, सर्व, तिच्यामध्ये, माती, आई.

- **ही कविता चालीवर साभिनय म्हणा.** (२.४.२)

- **रिकाम्या जागी येणारा कवितेतील शब्द सांगा.** (२.४.२)

  (१) काया काया शेतामंधी

  .................. जिरव जिरव.

  तेव्हा उगल उगल

  .................. हिरवं.

  (२) येता पीकाले बहार

  शेताशेतात .................. .

  (३) अशी धरत्रीची माया

  अरे, तीले नही .................. .

  (४) अशी भाग्यवंत ..................

  भाऊरायाची जमीन.

- **मूठभर गहू अंगणात किंवा कुंडीत पेरून रोपांच्या वाढीचे निरीक्षण करा. वाढ कशी होते ते सांगा.** (२.४.३)

- **हे शब्द असेच लिहा.** (९.४.१)

  पीक, सीमा, जमीन, वडील.



# ९. बलाढ्य मुंगी

बलाढ्य मुंगी ? हे काय सांगता आहात ? आपल्याला माहीत असलेल्या प्राण्यांमध्ये मुंगी हा तर सर्वांत लहान प्राणी आहे, असे आपण समजतो. मग मुंगी बलाढ्य कशी ? एकेक मुंगी कोणीही सहज चिरडून टाकील, असे तुम्ही म्हणता. हो, तसे असले तरी मुंगी हा बलाढ्य प्राणी आहे. मुंगीचे बळ हे तिच्या संघटनेत आहे. मुंगी हा संघटना करून सामुदायिक जीवन जगणारा प्राणी आहे. मुंग्यांच्या संघटनेचे बळ एवढे मोठे असते, की मोठमोठे प्राणी त्यांना घाबरून दूर पळतात. माणसाचा एक अपवाद सोडला, तर उत्तम संघटना करून जगणारा मुंगीसारखा दुसरा प्राणी क्वचितच आढळतो.



२.४.३, ३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१

मुंग्यांच्या संघटनेतील शिस्त आणि चिकाटी हे चांगले गुण आहेत; पण त्यांचा हिंसक आणि क्रूर स्वभाव पाहिला, की आश्चर्य वाटते. रानातल्या मुंग्या त्यांच्या मार्गात येणाऱ्या प्रत्येक प्राण्यावर सामुदायिक हल्ला चढवून त्याचा हां हां म्हणता फडशा पाडतात.

शास्त्रज्ञांना माहीत असलेल्या मुंग्यांच्या सुमारे ५००० जाती आहेत. या जातींचे ठळक असे आठ गट आहेत. रानात मातीची वारुळे करून राहणारी मुंगी; ही मुंग्यांची प्रमुख जात होय. मुंग्यांचे वारुळ जर फोडले, तर मुंग्यांच्या झुंडीच्या झुंडी आतून बाहेर पडतात. एका वारुळात कित्येक लाख मुंग्या असतात. गंमत अशी की मुंग्यांची ही पैदास एकाच 'राणी मुंगी'पासून झालेली असते. ही 'मुंगी' वर्षातून दहा वेळा अंडी घालते. यांपैकी पहिल्या नऊ वेळेस घातलेल्या अंड्यांमधून जन्मणाऱ्या मुंग्या या कामगार व सैनिक मुंग्या असतात. आपल्या समूहासाठी खाद्य गोळा करणे, ते वाहून आणून वारुळात साठवणे आणि समूहाचे संरक्षण करणे ही या मुंग्यांची कामे असतात. दहाव्या वेळेस अंड्यांतून अनेक नर मुंग्या व राणी मुंग्या यांचा जन्म होतो.

एकदा कोशांमधून नव्या मुंग्या बाहेर पडल्या, की एका ठिकाणी स्थिर असलेला मुंग्यांचा हा समूह ताबडतोब भटकेगिरी सुरू करतो. मुंग्यांची फौज एकदा वारुळाच्या बाहेर पडली, की रानातील जमिनीवर जे जे मध्ये येईल त्याचा फडशा पाडत ती आगेकूच करत राहते. कोणत्या एका विशिष्ट दिशेला जायचे असे त्यांचे ठरलेले नसते. एकदा चाल सुरू झाल्यावर आघाडीवरच्या मुंग्या ज्या दिशेने जातील, त्या दिशेने मागील सर्व मुंग्या अगदी डोळे झाकून जाऊ लागतात. एखाद्या वेळेस त्यांची रांग तुटते

किंवा पुढच्या व मागच्या मुंग्यांमध्ये जास्त अंतर पडते. मुंग्यांच्या अंगाला एक प्रकारचा वास असतो. या वासाचा माग काढत मुंग्या जात राहतात; त्यामुळे रांग तुटली तरी शेवटी त्या एके ठिकाणी येतात.

मुंग्यांची फौज येत आहे, असे पाहिल्यावर रानातील प्राणिवर्गात घबराट उडते. ज्यांना उडता येते ती पाखरे, फुलपाखरे यांसारखे प्राणी झटपट हवेत उडून सुरक्षित ठिकाणी जातात. उड्या मारणारे गवती किड्यांसारखे प्राणी आगेकूच करणाऱ्या मुंग्यांच्या दळापुढे सैरावैरा उड्या मारत पळत सुटतात. विंचू, कोळी अळ्यांसारखे कमी चपळ असलेले प्राणी मुंग्यांच्या कचाट्यात सापडतात. असा एखादा प्राणी मुंग्यांच्या कचाट्यात एकदा सापडला, की त्यातून त्याची सुटका होणे अगदी अशक्य. तो प्रतिकार करू लागला, किंवा नुसते अंग झटकू लागला तरी मुंग्या अधिकच चवताळतात. त्वेषाने त्याच्यावर एकदम तुटून पडतात. मुंग्यांचे दळ वाटेत सापडणाऱ्या सर्व कृमिकीटकांची अंडी, घरटी वगैरेंचा नाश करत पुढे जात राहते. अशा रीतीने मुंग्यांच्या सैनिकांनी भक्ष्याची एकदा शिकार केली, की मागाहून येणाऱ्या कामगार मुंग्या ते वारुळात वाहून नेण्याचे काम करतात.



लहानसहान प्राण्यांची गोष्ट तर सोडाच, पण सापासारखा मोठा प्राणीसुद्धा मुंग्यांना भयंकर घाबरतो. मुंग्यांचे दळ येत असल्याची नुसती चाहूल लागली तरी साप घाईने दूर निघून जातो. जर जखमी झालेला साप मुंग्यांच्या तावडीत सापडला, तर मरण्याखेरीज त्याला दुसरी गतीच नसते.

मुंगी हा असा हिंस्र व बलाढ्य प्राणी आहे; पण तिची शक्ती त्यांच्या समूहाच्या शिस्तशीर संघटनेत आहे.



**बलाढ्य** - शक्तीशाली, **संघटना** - एका विचाराने एकत्र आलेले, **हिंसक** - हिंसा करणारा, **क्रूर** - निर्दय, **भटकेगिरी** - भटकणे, **फडशा पाडणे** - संपवून टाकणे, **आगेकूच करणे** - पुढे पुढे चालणे, **आघाडी** - पुढचा, **दळ** - सैन्य, **कचाट्यात** - तावडीत, **भक्ष्य** - खाद्य.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) मुंग्यांचे बळ कशात आहे ?
  (२) शास्त्रज्ञांना माहीत असणाऱ्या मुंग्यांच्या सुमारे किती जाती आहेत ?
  (३) मुंग्यांची प्रमुख जात कोणती ?
  (४) नर मुंग्या व राणी मुंग्या यांचा जन्म केव्हा होतो ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) कामगार मुंग्या व सैनिक मुंग्या कोणती कामे करतात ?
  (२) मुंग्यांचा प्रवास कशा रीतीने होतो ?
  (३) मुंग्या आपले भक्ष्य कसे मिळवतात ?
  (४) मुंग्यांची फौज येत आहे, असे कळताच प्राणी-पक्ष्यांवर कोणता परिणाम होतो ?
- **मुंगी हा बलाढ्य प्राणी कसा आहे, ते लिहा.** (५.४.१, ५.४.२)

- **कंसात दिलेल्या शब्दसमूहांचा उपयोग करून खालील वाक्ये पूर्ण करा.** (९.४.१)

**(हल्ला चढवणे, फडशा पाडणे, आगेकूच करणे, घबराट उडणे)**

(१) सर्वांनी मिळून कामाचा .................................... .

(२) सैन्याच्या तुकडीने .................................... .

(३) सापाला अचानक समोर पाहताच माझी .................................... .

(४) सैनिक मुंग्यांनी सापावर .................................... .

- **वारूळ वारूळ मुंग्यांचे वारूळ**
  **कृमिकीटकांनी बांधले देऊळ**
  **ही कविता मिळवून वाचा.** (३.४.३)

- **मुंग्यांसारखे अनेक कीटक तुमच्या आसपास असतात. त्यांची यादी तयार करा. माहिती मिळवा. चित्रे काढा.** (४.४.३)

- **मुंगी आपली माहिती सांगत आहे, अशी कल्पना करून ती माहिती थोडक्यात सांगा.** (२.४.३)

- **मधमाशांची माहिती शिक्षकांकडून मिळवा. मिळालेली माहिती पंधरा-वीस वाक्यांत लिहून काढा.** (४.४.३)

**व्याकरण :** (६.४.१)

■ **खालील शब्दसमूह वाचा.**

(१) **बलाढ्य** मुंगी (२) **लहान** प्राणी (३) **उत्तम** संघटना

(४) **दुसरा** दिवस (५) **आठ** गट (६) **प्रचंड** सभा

वरील प्रत्येक शब्दसमूहातील दुसरा शब्द नाम आहे, हे तुम्हांला माहीत आहे. प्रत्येक समूहातील पहिला शब्द त्याच्यापुढे येणाऱ्या नामाची अधिक माहिती सांगत आहे.

मुंगी कशी ? - बलाढ्य		प्राणी केवढा ? - लहान
संघटना कशी ? - उत्तम		दिवस कितवा ? - दुसरा
गट किती ? - आठ		सभा केवढी ? - प्रचंड

यात मुंगी, प्राणी, संघटना, दिवस, गट आणि सभा या नामांबद्दल बलाढ्य, लहान, उत्तम, दुसरा, आठ आणि प्रचंड या शब्दांमुळे विशेष माहिती समजते.

अशाप्रकारे **नामाबद्दल विशेष माहिती सांगणाऱ्या शब्दास विशेषण म्हणतात.**

■ **विशेषण आणि नाम यांच्या योग्य जोड्या लावा.**

| अ | ब |
|---|---|
| हिरवा | मुंग्या |
| बलाढ्य | इमारत |
| लोखंडी | वाडा |
| पडका | पोपट |
| उंच | पत्रा |

■ **खालील वाक्यांतील मोकळ्या जागी कंसातील योग्य विशेषणे वापरा.**

(१) उन्हाळ्यात ............ ऊन पडते. (उबदार, पिवळे, कडक)

(२) मुख्य दिशा ............ आहेत. (बारा, चार, दहा)

(३) पावसाळ्यात आकाशात ............ ढग दिसतात.
(काळे, तांबूस, पांढरे)

(४) देवगिरीवर ............ वाटा होत्या. (उंच, फसव्या, बारा)

(५) ती ............ दरवाजे फिरून परत आली. (महा, आठ, सर्व)



| १०. | वीरांगना |
|---|---|

हैदराबादच्या स्वातंत्र्यलढ्यात अनेक पराक्रमी वीर धारातीर्थी पडले. अशा पराक्रमी व्यक्तींच्या नामावलीत गोदावरीबाई टेके यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. उस्मानाबाद जिल्ह्यातील ईट हे गोदावरीबाईंचे लहानसे गाव. त्यांचे पती किसनराव टेके रझाकारांच्या अत्याचाराविरुद्ध लढत होते, तर त्यांचा वीस वर्षांचा मुलगा सरहद्दीवरील कँपमधून स्वातंत्र्यासाठी झुंजत होता. दोघेही सत्याचे आणि शस्त्राचे पूजक होते. 'स्वातंत्र्यासाठी झुंजावे; शत्रूला मारोनी मरावे' हे त्यांचे ब्रीद !

वाघासारख्या तडफदार किसनरावांना शत्रू दबकून असत. भूम व कळंब या दोन तालुक्यांतील रझाकार तर सतत त्यांच्या मागावर असत; पण किसनराव त्यांना दाद लागू देत नसत. एकदा निःशस्त्र किसनरावांना रझाकारांनी अचानक घेरले. दुरूनच त्यांच्यावर गोळ्या झाडल्या. किसनराव ठार झाले !

पतीच्या निधनाची ही दुःखद वार्ता गोदावरीबाईंच्या कानी आली. मुलगा कँपवर गेलेला. घरी त्या एकट्याच. अशा अवस्थेत त्या अतिशय संतप्त झाल्या. त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंऐवजी सूडाचा अंगार भडकू लागला.

गोदावरीबाई घाबरणाऱ्या नव्हत्या, डगमगणाऱ्या नव्हत्या; वीरमरण पत्करणाऱ्या किसनरावांच्या त्या सहचारिणी होत्या.

क्षणभरातच गोदावरीबाईंनी मनाशी काही निश्चय केला. त्यांनी घराचे दरवाजे लावून घेतले. खुंटीवर अडकवलेली पतीची रायफल हाती घेतली, त्या शस्त्राला वंदन केले आणि त्या स्वतःशीच

३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२

म्हणाल्या, 'पतीच्या हत्येचा बदला घेईन तरच त्यांची सहचारिणी शोभेन !'

किसनरावांच्या हत्येनंतर रझाकार किसनरावांच्या वाड्यावर चालून आले. त्यांनी वाड्याला चारी बाजूंनी वेढा दिला. वाड्याचे दरवाजे बंद होते. दरवाजा फोडून आत घुसण्यासाठी रझाकार पुढे सरसावले. तेव्हा हातात रायफल घेऊन सावधपणे उभ्या असलेल्या गोदावरीबाईंनी खिडकीतून नेम धरला. धाडकन् बार उडाला, त्याबरोबर एक रझाकार उडून खाली कोसळला ! संपला !


गोदावरीबाई टेके


किसनराव टेके



गोदावरीबाईंनी पतीच्या हत्येचा बदला घेतला ! रझाकारांत भयाची लाट पसरली. वाघिणीने झडप घालून एका रझाकाराचा फडशा पाडला ! इतक्यात दुसरी गोळी सूं सूं करत आली. रझाकार सैरावैरा पळू लागले ! शेवटी त्यांनी घर पेटवायचे ठरवले. एका स्त्रीसमोर मात्रा चालेना, म्हणून तिचे घरच पेटवून देणे, ही काय शौर्याची कामगिरी झाली ! रझाकारांनी वाड्यास आग लावली. गोदावरीबाई वाड्यात कोंडल्या गेल्या ! धुराचे लोट निघू लागले ! वाड्यातून गोळ्या सुसाटत होत्या. आग वाढत चालली होती, पण गोदावरीबाईंना त्याची तमा नव्हती. आपण जळून जाऊ याचे त्यांना भय नव्हते. निर्भयपणे ती वीरांगना आतून गोळीबार करत होती. अग्नीच्या लवलवत्या ज्वाळा गोदावरीबाईंच्या जवळ येऊ लागल्या !

वाडा सर्व बाजूंनी पेटला ! ज्वाला आकाशात झेपावू लागल्या. आतून होणारा गोळीबारही थांबला ! त्या अग्निज्वालांनी या तेजस्वी, शूर ज्वालेला आपल्यात सामावून घेतले.

स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासात आणखी एक नाव सोनेरी अक्षरांत उमटले !

लेखक - वसंत पोतदार

**वीरांगना** - शूर स्त्री, **धारातीर्थी पडणे** - युद्धात मरण येणे, **सरहद्द** - सीमा, शीव, **झुंजणे** - लढणे, **ब्रीद** - निष्ठा, बाणा, व्रत, **दबकून असणे** - भिऊन असणे, **मागावर असणे** - शोधात असणे, **दाद लागू न देणे** - ठावठिकाणा लागू न देणे, **सहचारिणी** - पत्नी, **मात्रा चालेना** - उपाय चालेना, **तमा नसणे** - पर्वा नसणे, काळजी नसणे.

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)

(१) गोदावरीबाई कोणाशी लढल्या ?

(२) किसनरावांना रझाकार का भीत होते ?

(३) गोदावरीबाईंनी रायफल केव्हा हातात घेतली ?

(४) पतीची हत्या झाली, ही वार्ता कानीं पडताच गोदावरीबाईंनी कोणता निश्चय केला ?

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)

(१) किसनरावांना कशाप्रकारे मृत्यू आला ?

(२) गोदावरीबाईंना 'वीरांगना' का म्हटले आहे ?

- **खालील वाक्प्रचारांचा योग्य वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)

**धारातीर्थी पडणे, फडशा पाडणे, सैरावैरा पळणे, तमा नसणे**

(१) सर्व मित्रांनी मिळून कामाचा ..................

(२) देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढताना जे .............. ते अमर हुतात्मे झाले.

(३) वाघाला पाहताच जनावरे ..................

(४) इंग्रजांशी लढताना झाशीच्या राणीला स्वतःची ..................

- **आपल्या जवळपास राहणाऱ्या स्वातंत्र्य सैनिकाची मुलाखत घेऊन माहिती मिळवा. ती दहा ते पंधरा वाक्यांत लिहून काढा.** (४.४.३)

- **खालील दोन्ही वाक्यांत 'नाव' हा शब्द आला आहे. त्याचे वेगवेगळे अर्थ सांगा.** (९.४.१)

(१) स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासात गोदावरीबाई टेके यांचे 'नाव' सोनेरी अक्षरांत उमटले.

(२) आम्ही कागदाची 'नाव' तयार केली.

- **हे शब्द असेच लिहा.** (९.४.१)

धारातीर्थी, अतिशय, सूड, सहचारिणी.

## ११. पत्र

पां. स. साने
पालगड, ता. दापोली,
जि. रत्नागिरी.
१८ फेब्रुवारी, १९५०

चि. प्रिय सुधास,
सप्रेम आशीर्वाद.

मागील आठवड्यात मी तुला पत्र लिहिले नाही. मला जरा बरे नव्हते. आता दुखणे कमी आहे. काळजी करण्याचे कारण नाही. पडून होतो दोन-चार दिवस. त्यामुळे तुला पत्र लिहू शकलो नाही. रागावू नकोस.

तू चित्रकलेची परीक्षा पास झालीस, हे वाचून आनंद झाला. चित्रकला मला फार आवडते; परंतु मला ती येत नाही. तू ती कला वाढव. अगं, अधूनमधून घ्यावेत कुंचले, घ्यावेत रंग, बसावे काढत चित्र. वेळ कसा जातो कळतही नाही. साध्या रंगांतून नि रेषांतून सौंदर्य निर्माण करता येते.

अगं, गेले चार दिवस इकडे कडाक्याची थंडी पडली होती. तुमच्या तिकडे तर अधिकच असेल. दारे लावून बसली असाल सारी. होय ना ? अकस्मात कोठून आली ही थंडीची लाट ! सगळीकडे द्राक्षांच्या मळ्यांचे नुकसान झाले असेल. गव्हाच्या पिकावरही परिणाम झाला असेल. आणि आंबे ? आंबे गेल्या दोन-तीन

३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२

आठवड्यांत मोहोरले होते, त्यांचा मोहोर थंडीच्या कडाक्याने करपून, जळून गेला असेल. शेवटी प्रत्यक्ष हातांत पडेल तेव्हाच सारे खरे. शेते सुंदर पिकतात, तो अकस्मात अतिवृष्टी होते. कधी गारा पडतात. प्रीक असलेले जाते, तसेच हे आंब्यांचे वगैरे.

अगं खरेच, श्रीमती कुसाताईने तुला बोलावले आहे सुटीत. विसुभटजी गेले तरी कुसाताई आहे. तुझ्या आजीचा नि कुसाताईचा किती घरोबा. कुसाताईचा रामा परवा म्हणाला, की आईने सुधाला सुटीत बोलावले आहे म्हणून. तुला कसे काय जमेल ? तू पत्र तरी त्यांना टाक.

रानांतील मेवे आता तयार होत आहेत. काजू तुरळक तुरळक पिकू लागले आहेत. करवंदीच्या जाळी करवंदांनी भरल्या आहेत. परवा एका गावी जात होतो. दुतर्फा दाट जंगल होते. मधून-मधून पळस फुललेले दिसत होते. हिरव्या रानांत त्यांची लाल फुले शोभून दिसत होती. पांढरे चाफेही आता फुलू लागले आहेत.

तुला लवकरच उन्हाळ्याची सुटी मिळेल. मुंबईस इंदूचे लग्न आहे, तसेच राजाचेही लग्न आहे. सुटी अनायासे आहे. तुम्ही यालच. मीही येईन म्हणतो. अरुणाला पाहीन. ती आता मोठी झाली असेल. १२ तारखेस ती अडीच वर्षांची झाली. खूप बोलते ना ? लहानपणी मुलांत अपार शक्ती असते. ती किती चालतात, किती खेळतात, किती बोलतात, किती हसतात, किती रडतात ! गंमत वाटते मुलांची.

यंदा तरी उन्हाळ्याच्या सुटीत सगळे घरी या. कितीतरी वर्षांत तुम्ही आला नाहीत. हे घर, ही झाडेमाडे तुमची वाट पाहत आहेत. याल का ? वर्षातून चार दिवस तरी घरी यावे. सर्वांना भेटावे. गावातील मंडळी भेटतात, संबंध ताजे राहतात.

तुझ्या परीक्षेचा निकाल कळव. अप्पा, ताई यांस स. प्रणाम.

आनंदाला व अरुणाला स. आशीर्वाद. शेजारीही सर्वांना नमस्कार. गोदावरीच्या मेधाची प्रकृती कशी आहे ? ताप थांबला का तिचा ?

तुझा,

अण्णा

**चि.** - चिरंजीव शब्दातील सुरुवातीचे अक्षर, **कुंचला** - रंग देण्याचे एक साधन (ब्रश), **अकस्मात** - अचानक, **मोहोरणे** - फुलून येणे, **अतिवृष्टी** - खूप पाऊस पडणे, **घरोबा** - जिव्हाळ्याचे संबंध, **दुतर्फा** - दोन्ही बाजूंस, **रानांतील मेवे** - रानांतील फळे, **अनायासे** - सहज, **अपार** - खूप, **स. प्रणाम** - सप्रेम प्रणाम.

**(पां. स. साने - पांडुरंग सदाशिव साने म्हणजे अण्णा उर्फ सानेगुरुजी)**

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) हे पत्र कोणी कोणास लिहिले आहे ?
  (२) सुधाच्या अण्णांचे नाव काय ?
  (३) सुधा कोणत्या परीक्षेत पास झाली होती ?
  (४) हिरव्या रानात काय शोभून दिसत होते ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) सानेगुरुजींना चित्रकला का आवडते ?
  (२) सानेगुरुजींचे निसर्गप्रेम कशावरून दिसून येते ?
  (३) 'लहानपणी मुलांत अपार शक्ती असते' असे अण्णांना का वाटते ?
  (४) या पत्रात 'वर्षातून चार दिवस तरी घरी यावे,' असे अण्णांनी का म्हटले आहे ?
- **गावातील पोस्टातून प्रत्येकी एक कार्ड किंवा अंतर्देशीय पत्र आणा आणि खालीलपैकी एका विषयावर मित्राला योग्य मायन्यासह पत्र लिहा.** (४.४.३)
  (१) वक्तृत्व स्पर्धेत प्रथम क्रमांक मिळाल्याबद्दल अभिनंदन करणे.
  (२) सुटीत घेतलेल्या अनुभवांची माहिती देणे.

❑❑❑

# १२. हळूच या हो हळूच या !

हळूच या हो हळूच या ! ध्रु.

गोड सकाळी ऊन पडे
दंवबिंदूंचे पडति सडे
हिरव्या पानांतुन वरती
येवोनी फुलतो जगती
हृदये अमुची इवलीशी
परि गंधाच्या मधि राशी
हासुनी डोलुन
देतो उधळुन
सुगंध या तो सेवाया
हळूच या पण हळूच या ! ॥१॥

कधि पानांच्या आड दडू
कधि आणू लटकेच रडू
कधि वाऱ्याच्या झोताने
डोलत बसतो गमतीने
तऱ्हेतऱ्हेचे रंग किती
अमुच्या या अंगावरती
निर्मल सुंदर
अमुचे अंतर
या आम्हांला भेटाया
हळूच या पण हळूच या ! ॥२॥

कवी - कुसुमाग्रज

१.४.३, २.४.२, ३.४.२, ४.४.३, ५.४.१, ५.४.२

दंव - दहिवर
गंधाच्या राशी - खूप सुवास
लटके - खोटे खोटे
अंतर - मन
परि - परंतु
सेवाया - उपभोग घ्यायला
निर्मल - शुद्ध

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.२)
  (१) सकाळच्या उन्हात कशाचे सडे पडतात ?
  (२) फुले कशाकरता बोलावत आहेत ?
  (३) फुलांना कोठे लपून बसावेसे वाटते ?
  (४) फुले त्यांना भेटायला येणाऱ्यांस काय म्हणतात ?

- **या कवितेत फुले आपल्याशी बोलत आहेत. वाचा.** (३.४.२)

"मुलांनो हळूच या. सकाळच्या उन्हात दवबिंदूंचे सडे... पडतात. हिरव्या पानांतून आम्ही येतो. आमच्या इवल्या हृदयात सुवासाच्या राशी आहेत. हा सुगंध सेवायला या. आमचे रंगही तऱ्हेतऱ्हेचे. आम्हांला भेटायला या.

- **फुलपाखरे आपल्याशी बोलत आहेत, अशी कल्पना करून रिकाम्या जागी कंसातील योग्य शब्द भरा.** (५.४.१)

मुलांनो, हळूच या. सकाळच्या उन्हात दंवबिंदूंचे सडे पडतात. ............ फुलांवर आम्ही बसतो. आमचे ............ इवलेसे आहेत. आमच्या ............ नक्षी आहे. ही ............ बघायला हळूच या. आम्ही ............ . आमचे रंगही तऱ्हेतऱ्हेचे. या ना आम्हांला ............

**(पाहायला, उडतो, रंगीबेरंगी, पंख, नक्षी, पंखांवर)**

- **फुलांच्या पाकळ्यांप्रमाणे कागदी पाकळ्या लावून गोलाकार उभे राहून नाचत नाचत ही कविता म्हणा.** (२.४.२)

- **रिकाम्या जागी योग्य शब्द भरा.** (५.४.१)

  (१) निर्मल सुंदर
  अमुचे ..............

  (२) हासुनी ..............
  देतो उधळुन.

  (३) कधि .............. झोताने
  डोलत बसतो गमतीने.

- **जोड्या जुळवा.** (५.४.१)

| | |
|---|---|
| गोड | वारा |
| इवलेसे | सडे |
| डोलवणारा | सकाळ |
| विविध रंग | हृदय |
| दंवबिंदू | फुले |

- **'गोड सकाळी' असे का म्हटले आहे ? शिक्षकांच्या मदतीने समजून घ्या.** (५.४.२)

- **या कवितेत केलेले फुलांचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.** (४.४.३)

- **परिसरात मिळणाऱ्या पानाफुलांचा उपयोग करून वर्गाची सजावट करा.** (१.४.३)

> कविता चालीवर म्हणता यावी; म्हणून काही शब्दांतील अक्षरे कवितेत ऱ्हस्व दिली आहेत; परंतु ती गद्यात लिहिताना दीर्घ लिहावीत. असे शब्द कवितेतून शोधा. (९.४.१)



# १३. विद्यार्थ्यांनो जागृत व्हा !



(डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी विद्यार्थ्यांना उद्‌देशून केलेले भाषण)

''विद्यार्थिदशेत कसे वागावे यांबाबत मी स्वानुभवाने काहीना काही सांगू शकेन. ज्या समाजात गेली हजारो वर्षेपावेतो कसलेही शिक्षण नव्हते. त्या समाजातील पुष्कळ लोक अलीकडे बी. ए. व एम. ए. वगैरे विद्यापीठाच्या पदव्या घेऊन बाहेर पडताना पाहून कोणास समाधान वाटणार नाही ?

तुम्ही जे शिक्षण घेता ते असे घ्या, की त्यामुळे आपले सर्व विद्यार्थी सरस झाले पाहिजेत. अडाणी आईबापांच्या पोटी जन्म घेऊन, जर बी. ए. झालात तर त्याबद्‌दल दुरभिमान बाळगू नका. आपल्या कर्तव्याची जाणीव ठेवून झटून अभ्यास करा.

३.४.३, ४.४.१, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१

आत्मविश्वासासारखी दुसरी दैवी शक्ती नाही. आम्ही आमच्यातील आत्मविश्वास गमावता कामा नये. उदाहरणार्थ - कुस्ती खेळण्यासाठी आखाड्यात उतरलेला पहिलवान दुसऱ्याच्या ठणठणीत दंड थोपटण्याने घाबरून गेल्यास त्याच्या हातून काहीतरी होणे शक्य आहे काय ? मी तर नेहमी असे म्हणत असतो, की मी जे करीन ते होईल. अर्थात, मी हे सर्व आत्मविश्वासावर अवलंबून म्हणत असतो.

गरिबीच्या दृष्टीने विचार करता आजच्या गरिबातील गरीब विद्यार्थ्यापेक्षा माझी त्यावेळी मोठी चांगली सोय अगर मला इतर अनुकूलता होती असे नाही. मुंबईच्या डेव्हलपमेंट डिपार्टमेंटच्या चाळीत दहा फूट लांब व दहा फूट रुंद अशा खोलीत आई-बाप, भावंडे यांच्यासह राहून एका पैशाच्या घासलेट तेलावर मी अभ्यास केला आहे. इतकेच नव्हे तर अनेक अडचणींना व संकटांना तोंड देऊन मी जर एवढे करू शकलो, तर तुम्हांस आजच्या साधनसामुग्रीने सज्ज असलेल्या काळात अशक्य का होईल ? कोणताही मनुष्य सतत दीर्घोद्योगानेच पराक्रमी व बुद्धिमान होऊ शकतो. कोणीही मनुष्य उपजत बुद्धिमान अगर पराक्रमी निपजू शकत नाही. विद्यार्थी दशेत इंग्लंडमध्ये असताना ज्या अभ्यासक्रमास ८ वर्षे लागतात, तो अभ्यास मी २ वर्षे ३ महिन्यांत यशस्वीतऱ्हेने पूर्ण केला. हे करण्यासाठी मला २४ तासांपैकी २१ तास अभ्यास करावा लागला. जरी माझी आज चाळीशी उलटून गेली असली, तरी मी अजूनही २४ तासांपैकी सारखा १८ तास काम करत असतो.

दीर्घोद्योग व कष्ट करण्यानेच यशप्राप्ती होते. नुसत्या पदव्या मिळवण्याने काही होणार नाही. आपल्या विद्यार्थ्यांची अशी समजूत झालेली असते, की बी. ए. पदवीधर झाला, की आता पुढे काहीच

शिकायचे राहिले नाही; परंतु खरे पाहता बी. ए. झाल्यावर फार झाले, तर शिक्षकाशिवाय स्वतंत्रपणे अभ्यास करता येईल. म्हणजेच जे शिकायचे आहे ते पुढेच असते. माणसाने जन्मभर जरी शिकायचे मनात आणले, तरी विद्यासागराच्या कडेला असलेल्या गुडघाभर ज्ञानात फार झाले, तर जाता येईल.

विद्येबरोबरच आमच्यात शील पाहिजे. शीलाशिवाय विद्या फुकाची आहे; कारण विद्या एक शस्त्र आहे. एखाद्या जवळ विद्येचे शस्त्र असेल व तो शीलवान असेल, तर त्यायोगे तो एकाचे संरक्षण करील. तोच इसम जर शीलवान नसेल, तर विद्येच्या शस्त्राने दुसऱ्याचा घात करील. विद्या ही तलवारीसारखी आहे; परंतु तिचे महत्त्व तिला धारण करणाऱ्यावर अवलंबून राहील, कारण अडाणी मनुष्य कोणास साधारणपणे फसवू शकत नाही. फसवावे कसे हेच त्याला उमगत नाही; परंतु शिकल्या-सवरलेल्या लोकांच्या ठिकाणी कोणास कसे फसवावे व त्या फसवण्यासाठी लागणारा युक्तिवाद असल्याने खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे ते भासवू शकतात.

लबाडी करण्यास चातुर्य व बुद्धी लागते; परंतु चातुर्य व बुद्धी हिला सदाचारांची अर्थात शीलाची जोड मिळाली, तर लबाडी अगर फसवाफसवी करावीशी वाटणार नाही आणि म्हणून शिकल्या-सवरलेल्या लोकांत शीलाची अत्यंत जरुरी आहे. शीलाशिवाय जर शिकले सवरलेले लोक निपजू लागले, तर त्यांच्या शिक्षणातच समाजाचा व राष्ट्राचा नाश आहे. तेव्हा शीलाची शिक्षणापेक्षा किती अधिक किंमत आहे, हे तुमच्या ध्यानी आले असेलच आणि म्हणून प्रत्येक इसमास प्रथम शील असले पाहिजे.

लेखक - डॉ. बाबासाहेब आंबेडकर



**स्वानुभव** - स्वतःला आलेला अनुभव, **सरस** - अधिक चांगला, **दुरभिमान** - अनावश्यक अभिमान, **आखाडा** - कुस्ती खेळण्याची जागा, **दीर्घोद्योग** - सतत चालणारा उद्योग, **उपजत** - जन्मापासून असलेले, **निपजणे** - उत्पन्न होणे, **शील** - चारित्र्य, **फुकाची** - व्यर्थ, **सदाचार** - चांगली वागणूक.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे सांगा.** (५.४.१)
  (१) डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी कोणत्या गोष्टीस दैवी शक्ती म्हटले आहे ?
  (२) माणूस कोणत्या गोष्टीने पराक्रमी व बुद्धिमान होऊ शकतो ?
  (३) चातुर्य आणि बुद्धी याला कशाची जोड असावी लागते ?
  (४) शिक्षणापेक्षा अधिक किंमत कशाची आहे ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) डॉ. आंबेडकरांनी कोणत्या गोष्टीचा दुरभिमान बाळगू नका असे म्हटले आहे ?
  (२) 'चातुर्य व बुद्धीला सदाचाराची जोड असायला हवी.' असे डॉ. आंबेडकर का म्हणतात ?
- **कंसातील शब्दांचा उपयोग करून खालील वाक्ये पूर्ण करा.** (५.४.१)
  **(शील, दुरभिमान, यश, आत्मविश्वास)**
  दीर्घोद्योग व कष्ट करण्यानेच .................. प्राप्त होते. .................. सारखी दुसरी दैवी शक्ती नाही. अडाणी आईबापांच्या पोटी जन्म घेऊन खूप शिकलात, तर त्याबद्दल .................. बाळगू नका. विद्येबरोबरच आमच्यात .................. पाहिजे.
- **'आत्मविश्वासासारखी दुसरी दैवी शक्ती नाही.' डॉ. आंबेडकरांच्या या विधानाबाबत तुमचे विचार आठ ते दहा वाक्यांत लिहा.** (४.४.३)
- **तुम्हांला मोठेपणी कोण व्हावेसे वाटते ? त्यासाठी तुम्ही आतापासून काय करणार ? ते आठ ते दहा वाक्यांत लिहा.** (४.४.३)
- **डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसंबंधी पुस्तक वाचून माहिती मिळवा आणि त्यांचा जीवनपट शिक्षकांच्या मदतीने तयार करा. किंवा त्यांच्या जीवनातील तुम्हांला आवडणाऱ्या प्रसंगाचे वर्णन करा.** (३.४.३)

## व्याकरण : (६.४.१)

- **खालील वाक्ये वाचा.**

(१) विद्या एक शस्त्र **आहे.**

(२) डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी खूप अभ्यास **केला.**

(३) डॉ. बाबासाहेब आंबेडकर उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला **गेले.**

वरील तिन्ही वाक्यांत कोणाबद्दल काहीतरी सांगितले आहे. पहिल्या वाक्यात 'विद्या एक शस्त्र आहे.' म्हणून सांगितले आहे. 'आहे' या शब्दात 'असण्याची' क्रिया आहे. दुसऱ्या वाक्यात 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी खूप अभ्यास केला', यातील 'केला' या शब्दाने 'करण्याची' क्रिया दाखवली आहे. तिसऱ्या वाक्यातील 'गेले' या शब्दाने 'जाण्याची' क्रिया दाखवली आहे.

प्रत्येक वाक्यात 'क्रिया' दाखवणारा शब्द आहे. 'आहे, केला, गेले' हे क्रिया दाखवणारे शब्द आहेत आणि या शब्दांमुळे वाक्यांचे अर्थही पूर्ण झाले आहेत. **वाक्याचा अर्थ पूर्ण करणाऱ्या क्रियावाचक शब्दास क्रियापद म्हणतात.**

वरील वाक्यात 'आहे, केला, गेले' ही क्रियापदे आहेत. बहुतेक वाक्यांत क्रियापद वाक्याच्या शेवटी येते; परंतु काही वाक्यांत क्रियापद मध्येही येते.

खालील दोन वाक्ये पाहा.

(१) **रामजी हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे वडील होते.**

या वाक्यात क्रियापद शेवटी आहे.

(२) **एक होता शेतकरी.**

या वाक्यात क्रियापद मध्ये आहे.

- **खालील वाक्यांतील क्रियापदे ओळखा.**

(१) वेशीच्या पलीकडे चारमिनार आहे.

(२) सुदीपने अभ्यास केला.

(३) काल रविवार होता.

- **खालील क्रियापदांचा वाक्यांत उपयोग करा.**

ठरवणे पाहणे
कापणे झोपणे
देणे

- **खालील वाक्यांतील मोकळ्या जागी कंसात दिलेली क्रियापदे योग्य ठिकाणी लिहा.**

(उठला, येतो, नेले, वाटले)

(१) गुरुजींना समोरून येताना पाहून पारावर बसलेला राम पटकन ..................

(२) मला खूप नवल ..................

(३) झाडांवरील सगळे आंबे रस्त्यावरून जाणाऱ्या माणसांनी तोडून ..................

(४) गणू कामावरून रोज संध्याकाळी खूप उशिरा घरी ..................



# १४. मुलाचे पाय पाळण्यात दिसतात

बटण दाबले, की विजेचे दिवे पटकन लागतात. घरात सगळीकडे लख्ख प्रकाश पडतो. छोटीमोठी इंजिने आता विजेवर चालतात; म्हणून आपली कामे जलद व सुखद होतात. विजेमुळे आकाशवाणीचे, दूरचित्रवाणीचे कार्यक्रम आपल्याला ऐकायला व पाहायला मिळतात. ही सर्व जादू कोणी केली ? थॉमस एडिसनने.



थॉमस आल्व्हा एडिसन याचा जन्म अमेरिकेतील ओहिओ संस्थानात सन १८४७ मध्ये झाला. विजेचा दिवा, तारायंत्र, चित्रपट यांसारखे अनेक शोध त्याने लावले. अमेरिकेत तर त्याला त्या काळी 'जादूगार'च म्हणत असत.

२.४.३, ३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१

एडिसन लहानपणापासूनच मोठा खटपट्या होता. एखाद्या गोष्टीचे वेड त्याच्या डोक्यात शिरले, की मग त्याला इतर गोष्टींची आठवणच होत नसे. शाळेच्या अभ्यासापेक्षा वेगवेगळे प्रयोग करण्यात त्याला अधिक गोडी वाटे. त्याच्या आईने त्याला घरीच शिक्षण दिले.

हा एडिसन लहानपणापासूनच निरनिराळे प्रयोग करण्यात गर्क असे. कित्येकांना तो फार विक्षिप्तपणा करतो असे वाटे, पण खरे तर तो विक्षिप्तपणा नसून प्रयोग असे. प्रयोग करून पाहण्याचे त्याला जणू वेडच लागले होते. 'हे असे का ? ते तसे का ?' असे अनेक प्रश्न विचारून तो आईवडिलांना भंडावून सोडी. त्याच्या बालपणीचे काही प्रसंग मोठे मजेदार आहेत. त्यावरून तो मोठा संशोधक होणार, हे स्पष्ट दिसत होते.

एडिसनला प्रयोगासाठी वेगवेगळ्या वस्तू जमवण्याचा फार नाद होता. खिळे, पत्रे, पट्ट्या, तारांचे तुकडे, बाटल्या, वेगवेगळी रसायने यांनी त्याची खोली नेहमी भरलेली असे. त्याने आपल्या खोलीचे वस्तुसंग्रहालयच करून टाकले होते. आई-वडिलांकडून खाऊला जे पैसे मिळत, त्यातून तो पुस्तके आणि वस्तू खरेदी करत असे. प्रयोगांत तो तासन्तास रमून जात असे.

पुस्तकांत वाचलेले प्रयोग तो स्वतः करून पाही. त्याला प्रयोगांसाठी दिवसेंदिवस अधिक पैशाची गरज भासू लागली; पण पैसा वेळेवर मिळेना. हवी ती पुस्तके त्याला घेता येईनात. तो या स्थितीला कंटाळला.

शेवटी एडिसनने स्वतः पैसे मिळवायचे ठरवले. त्यावेळी त्याचे वय जेमतेम बारा वर्षांचे होते. त्याने आगगाडीत फळे व वर्तमानपत्रे विकायचा ठेका घेतला. फळे व वर्तमानपत्रे विकून जो नफा मिळे, त्यातून तो पुस्तके आणि प्रयोगाचे सामान खरेदी करत असे. त्याला

गाडीत गार्डाच्या डब्याशेजारी एक डबा मिळाला होता. दोन स्टेशनांच्या दरम्यान जो वेळ मिळे त्या वेळात तो तेथे प्रयोग करी व पुस्तके वाचत बसे. दिवसातून पंधरा-सोळा तास तो न थकता काम करत असे. उपाहारगृहात जे वेगवेगळे जिन्नस मिळतात, त्याचे दरपत्रक छापायचा एक छोटासा छापखाना त्याला स्वस्तात मिळाला. तो त्याने खरेदी केला. मिळणाऱ्या वेळात खिळे जुळवून तळहाताएवढे छोटेसे वर्तमानपत्र तो डब्यातच छापू लागला आणि स्टेशन आले, की ते विकू लागला. अशा रीतीने वयाच्या पंधराव्या वर्षी तो संपादक झाला. एकीकडे कागद, दुसरीकडे पुस्तके, तिसरीकडे प्रयोगाच्या बाटल्या आणि चौथीकडे विक्रीचा माल, असा त्याचा डबा भरलेला असायचा.



एकदा तो प्रयोग करत असता फॉस्फरस नावाचा ज्वालाग्राही पदार्थ खाली सांडला आणि आग लागली. ती त्याने कशीबशी

विझवली. ही गोष्ट गार्डाला समजल्यावर त्याने एडिसनचे सारे सामान गाडीबाहेर फेकून दिले आणि त्याला खाली हाकलून लावले.

एडिसनपुढे पुन्हा आता काय करायचे ? आपली प्रयोगांची आवड कशी भागवायची ? हा प्रश्न उभा राहिला. पण तो संकटांनी डगमगून जाणारा लेचापेचा नव्हता. त्याने धडपड करून पुन्हा आपले बस्तान बसवले. रेल्वेत तो नोकरीला लागला आणि फावल्या वेळी प्रयोगही करू लागला. प्रयोग करण्याची ही वृत्ती जोपासल्यानेच तो पुढे एक मोठा संशोधक होऊ शकला.

लेखक - यदुनाथ थत्ते



**गर्क असणे** - मग्न असणे, **विक्षिप्त** - विचित्र, तऱ्हेवाईक, **भंडावणे** - त्रासून सोडणे, **संशोधक** - शोध लावणारा, **नाद** - छंद, **वस्तुसंग्रहालय** - वस्तू प्रदर्शनार्थ जमवून ठेवलेले ठिकाण, **रमून जाणे** - तल्लीन होणे, गर्क होणे, **ठेका** - कंत्राट, मक्ता, **जिन्नस** - वस्तू, पदार्थ, **उपाहारगृह** - खाण्याचे पदार्थ मिळण्याचे ठिकाण, **संपादक** - मजकुराची निवड व मांडणी करणारा, **ज्वालाग्राही** - पटकन पेट घेणारा, **लेचापेचा** - कमकुवत, **बस्तान बसवणे** - जम बसवणे.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे सांगा.** (५.४.१)
  - (१) एडिसनचा जन्म केव्हा व कोठे झाला ?
  - (२) एडिसनला कोणत्या गोष्टीचा नाद होता ?
  - (३) एडिसनची खोली कोणकोणत्या वस्तूंनी भरलेली असे ?
  - (४) रेल्वेच्या डब्यात मोकळ्या वेळेत एडिसन काय काय करत असे ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन-चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  - (१) एडिसन कोणत्या परिस्थितीला कंटाळला होता ?
  - (२) एडिसनने स्वतः पैसे कमवण्यासाठी काय केले ?
  - (३) एडिसन संपादक कसा झाला ?

- **कारणे सांगा.** (५.४.२)

  (१) एडिसनच्या आईने त्याला घरीच शिक्षण दिले.

  (२) एडिसन आगगाडीत फळे व वर्तमानपत्रे विकत असे.

  (३) गार्डने एडिसनला गाडीतून हाकलून दिले.

- **'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात' ही म्हण एडिसनला कशी लागू पडते ते सांगा.** (५.४.१)

- रिकाम्या जागी पाठातील योग्य शब्द भरा. (५.४.१)

  (१) एडिसन लहानपणापासून निरनिराळे प्रयोग करण्यात ................... .

  (२) एडिसनला प्रयोगासाठी वेगवेगळ्या वस्तू जमवण्याचा फार ............ .

  (३) एडिसनने आगगाडीत फळे व वर्तमानपत्रे विकायचा ................... .

  (४) एडिसनने धडपड करून पुन्हा आपले ................... .

- **खाली काही प्रश्न दिले आहेत. त्यांच्या मदतीने 'मी शास्त्रज्ञ झालो तर !' या विषयावर निबंध लिहा.** (४.४.३)

  (१) शास्त्रज्ञ का व्हावेसे वाटते ?

  (२) कोणते शोध लावावेसे वाटतात ?

  (३) त्यासाठी तुम्ही काय-काय कराल ?

- **तुमच्या लहानपणीच्या काही आठवणी आईवडिलांकडून ऐका व आठ ते दहा वाक्यांत लिहा.** (४.४.३)

- 'टाकाऊतून टिकाऊ' वस्तू बनू शकतात. तुमच्या शिक्षकांच्या मार्गदर्शनाने अशा वस्तू बनवा. वर्गात त्यांचे प्रदर्शन भरवा. कृती सांगा. (२.४.३)

- उपाहार आणि उपहार या दोन शब्दांच्या अर्थातील फरक माहीत करून घ्या. (९.४.१)

**व्याकरण : (६.४.१)**

- **खालील वाक्ये वाचा.**

(१) एडिसन प्रयोग **करतो.**

(२) एडिसनने प्रयोग **केले.**

(३) एडिसन प्रयोग **करील.**

वरील तिन्ही वाक्यांतील क्रियापदात 'करण्याची' क्रिया आहे. क्रियापदावरून वाक्यात कोणती क्रिया घडते ते समजते आणि ती क्रिया कोणत्या वेळी घडते हेही समजते.

पहिल्या वाक्यातील क्रियापदावरून ही क्रिया **'आता'** घडते असे लक्षात येते.

दुसऱ्या वाक्यातील क्रियापदावरून करण्याची क्रिया **'पूर्वी'** घडली हे समजते.

तिसऱ्या वाक्यातील क्रियापदावरून ही क्रिया **'पुढे'** घडेल हे समजून येते.

म्हणजे क्रियापदावरून क्रिया कोणत्या काळात घडली हे लक्षात येते.

क्रिया चालू असते तेव्हा **क्रियापद 'वर्तमानकाळी' असते.**

क्रिया पूर्वी झालेली असते तेव्हा **क्रियापद 'भूतकाळी' असते.**

क्रिया पुढे व्हायची असते तेव्हा **क्रियापद 'भविष्यकाळी' असते.**

**क्रियापदावरून क्रिया कोणत्या वेळी घडत आहे, हे लक्षात येते त्यास 'काळ' असे म्हणतात.**

मुख्य काळ तीन आहेत.

(१) वर्तमानकाळ, (२) भूतकाळ, (३) भविष्यकाळ.

वरील तीन वाक्यांचे काळ आता तुमच्या लक्षात येतील.

(१) एडिसन प्रयोग करतो – वर्तमानकाळ

(२) एडिसनने प्रयोग केले – भूतकाळ

(३) एडिसन प्रयोग करील – भविष्यकाळ

आणखी काही वाक्ये पाहा.

**वर्तमानकाळ –** (१) आम्ही अभ्यास करतो.
(२) ताई शाळेत जाते.

**भूतकाळ –** (१) एडिसनने विजेचा शोध लावला.
(२) एडिसन संपादकही होता.

**भविष्यकाळ –** (१) गाडी थोड्या वेळाने जाईल.
(२) मी पुढील वर्षी पाचवीत जाईन.

■ **खालील वाक्यांतील क्रियापदांचे काळ ओळखा.**

- पं. नेहरू भारताचे पंतप्रधान होते.
- संतोष पुस्तक वाचतो.
- बाबांनी मला पुस्तके आणली.
- मांजर दूध पिते.
- काल रविवार होता.
- आज सोमवार आहे.
- उद्या आमची सहल जाईल.

■ **कंसातील सूचनेप्रमाणे काळ बदलून वाक्ये तयार करा.**

(१) माया चित्र काढते. (भविष्यकाळ)
(२) नितीनने पुस्तक आणले. (वर्तमानकाळ)
(३) सुलभा समुद्र पाहते. (भूतकाळ)

■ **खालील क्रियापदांवरून काळ ओळखा आणि या क्रियापदांचा वाक्यांत उपयोग करा.**

गेला, खाईल, काढले, पळते, विणतो, येईल



# १५. अति तिथं माती

(चक्रमादित्य महाराजांचा दरबार. महाराज प्रवेश करतात.)

सेवक : समशेरबहाद्दर, श्रीमंत चक्रमादित्य महाराजांचा जयजयकार असो ! (सर्वजण जयजयकार करतात.) आस्ते कदम महाराज....आस्ते कदम.....

महाराज : (सिंहासनावर बसून) बसा मंडळी, बसा. (प्रधानास) काय प्रधानजी, कशी काय आहे राज्याची हालहवाल ?

प्रधानजी : (हात जोडून) आपल्या कृपेने उत्तम आहे. गोरगरीब भरपूर कष्ट करत आहेत. श्रीमंत लोक सुखात आहेत.

महाराज : छान ! उत्कृष्ट ! बरं, चोरीमारी वगैरे ?

प्रधानजी : छे ! कोणी चोरी करत नाहीत. फक्त चोर तेवढे चोऱ्या करत आहेत.

महाराज : फारच छान. बरं, रोगराई वगैरे ?

प्रधानजी : बिलकूल नाही ! चार-दोन साथीचे रोग आले. त्यांत शेपाचशे माणसं गेली. बाकी सगळे जिवंत आहेत.

महाराज : वा वा ! प्रधानजी, आमच्या राज्याची हालहवाल एकूण उत्तम आहे म्हणायची ! बरं, आज करमणुकीचा कार्यक्रम ?

प्रधानजी : एक उत्तम गवईबुवा आलेले आहेत. त्यांचं गाणं ऐकावं सरकार.

महाराज : त्याचं नाव काय म्हणालात ?

प्रधानजी : गानसेन.

महाराज : बरं बरं, बोलवा त्यांना.

(गवईबुवा येतात. नमस्कार करतात.)

३.४.३, ४.४.१, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१

गवई : महाराजांचा विजय असो !

महाराज : गवईबुवा, तुम्हांला काय येतं ? तबल्यावर पेटी वाजवून दाखवता ? नाहीतर असं करा, पेटीवर तबला वाजवा.

गवई : महाराज, मी वादक नाही. गवई आहे. संगीत गातो.

महाराज : बरं बरं, म्हणा काहीतरी.

(गवईबुवा मांडी घालून बसतात. हातवारे करून एक गाणे बेसूर आवाजात म्हणतात. महाराज खुश होतात.)

महाराज : वा ! गवईबुवा, तुमचा आवाज साखरेसारखा गोड आहे. बोला, तुम्हांला काय बक्षीस पाहिजे, बोला.

गवई : महाराज, मला स्वत:ला काही एक नको. सध्या संगीताला वाईट दिवस आले आहेत. संगीत-कलेसाठी काहीतरी करा.



महाराज : अवश्य, अवश्य ! काय बरं करावं ? (विचार करतो. मग टाळी वाजवून) हां, छान कल्पना सुचली, प्रधानजी –

प्रधानजी : आज्ञा महाराज.

महाराज : संगीताला उत्तेजन दिलं पाहिजे. आत्ताच्या आत्ता दवंडी पिटवा. म्हणावं, आजपासून आमच्या राज्यात सगळ्यांनी गाण्यात बोलायचं. कुणीही साधं बोलायचं नाही. सगळं गात गातच बोललं पाहिजे.

प्रधानजी : ठीक आहे, सरकार.

महाराज : जो कुणी गाण्यात बोलणार नाही त्याला शिक्षा करा. पहिल्यांदा त्याला सुळावर चढवा. मग हत्तीच्या पायी देऊन नंतर त्याचा कडेलोट करा आणि पुन्हा असं करणार नाही हे त्याच्याकडून लिहून घ्या.

प्रधानजी : आत्ताच दवंडी द्यायची व्यवस्था करतो.

(हळूहळू रंगमंचावर अंधार होतो. त्या अंधारातच प्रथम दवंडीचा आवाज व नंतर दवंडीवाल्याचे गाण्यात ओरडणे ऐकू येऊ लागते.)

दवंडीवाला : (गाण्याच्या चालीवर)

ऐका हो तुम्हि ऐका
ऐका हो ऐका !!
आजपासुनी सर्व बोलणे
व्हावे केवळ गाणे गाणे
केवळ गाणे आणि तराणे
चालणार नच इतर फलाणे
राजाज्ञा जो मोडिल कोणी
देउ सुळावर त्यास तत्क्षणी
ऐका हो तुम्हि ऐका !!



(दवंडी संपते. मग रंगमंचावरील प्रकाशात दोन राजदूत हातांत भाले घेऊन एकमेकांशी बोलत येतात.)

पहिला : (हसत) छे छे ! हसून हसून आपलं तर पोट दुखायची वेळ आली बुवा ! जिकडं बघावं तिकडं लोक नुसतं गाताहेत. साधं बोलणं नाहीच कुठं.

दुसरा : महाराजांची आज्ञा आहे ना ! कोण मोडणार ?

पहिला : काय एकेकाचे आवाज भसाडे आहेत रे ! त्यांनीसुद्धा गायचं म्हणजे काय हे ?

दुसरा : लोक अगदी त्रासून गेले आहेत.

पहिला : शूऽ ! कुणी गद्य बोललं, तर त्याला पकडायचं हे आपलं काम. आपणसुद्धा नाही बोलायचं.

(गात) गद्य कोण बोलतो, त्यास मी पकडतो
अन् सुळावरी त्यास मी चढवतो.

दुसरा : ए, ते बघ, ती दोघं नवरा-बायको भांडत इकडंच येत आहेत. बाजूला उभं राहून ऐकू या. साधी भांडताहेत की गाण्यातच ?

पहिला : चल तर लवकर.

(दोघे बाजूला उभे राहतात. नवरा घाईघाईने येतो. मागून बायको येऊन त्याचा हात धरते. दोघेही गाण्यातच बोलतात.)

बायको : तेल संपले, तूप संपले, मीठ संपले;
स्वैपाक आता मी करू कशाचा ?

नवरा : (रागावून) ए माझे आई,
नकोस खिंकाळू !
हा चाललो बाजाराला
आणून देतो माल तुला

बायको : (त्याच्या हातात पिशवी देत)
अन् येताना शेर दोन शेर
तुम्ही वांगी आणा छान सुरेख



नवरा : (बायको गेल्यावर स्वतःशीच गुणगुणत)
आणितो मी आणितो
तेल तूप मीठ वांगी
आणखी ती काय सांगी
(आठवत आठवत नवरा जातो. दोघेही राजदूत हसत हसत पुढे येतात.)

पहिला : कमाल आहे बुवा ! भांडणसुद्धा गाण्यात करायचं !

दुसरा : आता हे नवरोजी गेले बाजारात. तिथं ही गर्दी माणसांची ! प्रत्येक जण गाण्यातच बोलतोय !

पहिला : खरंच, बाजारात तर मोठी गंमत उडाली असेल नाही ?

दुसरा : अरे, गंमत म्हणजे काय ? नुसती मजा चाललीय मजा ! समज, तू दुकानदार अन् मी गिऱ्हाईक. मग मी विचारायचं-
(गात) दुकानदारदादा, अहो दुकानदारदादा
तुम्ही कसा दिला कांदा ?

पहिला : (दुकानदाराची नक्कल करत गात)
रुपयास चार शेर
रावसाहेब, रुपयास चार शेर.

दुसरा : (गात) द्या तर आम्हां एकच शेर
घालु नका हो कचराकेर.

पहिला : (गात) माल अमुचा पांढराफेक
कांदे किती हे स्वच्छ सुरेख !

दुसरा : (गात) चार आणे नाहीत फार

मांडून ठेवा आज उधार.

पहिला : (गात) नाही नाही नाही नाही, नाही चालणार

आज रोख अन् उद्या उधार.

(दोघेही खूप हसतात. मग नेहमीच्या आवाजात बोलतात.)

पहिला : का रे, बाजारात ही गंमत ! मग राजवाड्यात किती मौज उडाली असेल ?

दुसरा : राजवाड्यात ? अरे, तिथं तर साधं गाणं नाही, शास्त्रीय संगीत ! सगळं रागदारीत चाललंय.

पहिला : चल, तिथली गंमत प्रत्यक्षच बघितली पाहिजे. चल, चल लवकर. ('गद्य कोण बोलतो' हे गाणे म्हणत दोघेही जातात. रंगभूमीवर थोडा वेळ अंधार. मग राजवाडा दिसतो. लोक महाराजांचा गाण्यात जयजयकार करतात - 'जयजयकार महान, आपुला जयजयकार महान.')

महाराज : (गाणे म्हणत प्रवेश करतात.)

आलो आलो मी

राणी कुठे आमची ?

राणी : (गात) ही इथे महाराज मी.

महाराज : (गात) आज तुझे तोंड सुकले कशाने ?

राणी : (गात) या पडशाने मज गांजियले. (सटासट शिंकते.)

महाराज : (गात गात आज्ञा करतात.)

जा जा जा झणी घेऊन या वैद्या.

(एक सेवक जातो. तेवढ्यात आत आरडाओरड. 'महाराज ..... महाराज' अशा गाण्यातील हाका ऐकू येतात.)

महाराज : (घाबरून गातात) अरे, काय झाले ?

सेवक : (गडबडीने प्रवेश करून गातो.) महाराज....

महाराज : (गात) अरे, काय झाले ?
बोल लवकरी.

सेवक : (गात व ताना घेत) महाराज....

महाराज : (गात) अरे बोल ना झडकरी.

सेवक : (गात) महाराज, आपुला प्रिय राजवाडा....

महाराज : (गात) पुढे बोल गद्ध्या-

सेवक : (ताना घेत तीच ती ओळ घोळून घोळून म्हणतो.)
महाराज, आपुला प्रिय राजवाडा....

महाराज : (चिडून नेहमीच्या सुरात) आता बोलतोस लवकर का मुंडकं उडवू तुझं ?

सेवक : (गातगातच) आपुला प्रिय राजवाडा
अन् जळुनि खाक झाला.

महाराज : (घाबरून) काय ? माझा राजवाडा जळला ? मेलो, ठार मेलो मी. अन् मूर्खा, तू हे आता सांगतोस ?

सेवक : (नेहमीच्या आवाजात) क्षमा करावी महाराज, पण आपलीच आज्ञा होती ना सगळं गाण्यात सांगायचं म्हणून ?

महाराज : खड्ड्यात गेली ती आज्ञा. प्रधानजी–
(प्रधानजी येतात.) प्रधानजी, लोकांना म्हणावं नेहमीप्रमाणं बोला.

प्रधानजी : आज्ञा सरकार. अन् राजवाडा सुखरूप आहे आपला. थोडक्यात वाचला. आग विझवली.

महाराज : फारच छान, उत्कृष्ट ! आमच्या आज्ञेनं हा सगळा घोटाळा झाला. हे पाहा, आता जो कोणी गाईल त्याला सुळावर चढवण्यात येईल, अशी दवंडी लगेच पिटवा.

प्रधानजी : हां हां महाराज, लहान तोंडी मोठा घास मी घेतोय खरा !

क्षमा असावी. महाराज, अति तिथं माती. आपण ही आज्ञा परत घेतलीत तर उपकार होतील.

महाराज : शाबास प्रधानजी, पटलं आपल्याला. रद्द केली आम्ही आमची आज्ञा. खरं आहे तुमचं. अति तिथं माती—असं म्हटलंच आहे....कुणी बरं म्हटलंय ?

प्रधानजी : पण आज्ञा रद्द झाली ना ?

महाराज : झाली म्हणजे काय ? झालीच !

लेखक - द. मा. मिरासदार



**आस्ते कदम** - सावकाश पावले टाकत, **हालहवाल** - वर्तमान, सद्य-स्थिती, **कृपा** - दया, मेहेरबानी, **बेसूर** - सुरात नसलेले, **उत्तेजन देणे** - प्रोत्साहन देणे, **दवंडी** - राजाचा हुकूम वाद्य वाजवून जाहीरपणे सांगणे, **तराणा** - गाण्याचा एक प्रकार, **फलाणे** - अमुक, काही, **नच** - नाही, **तत्क्षणी** - त्याच क्षणाला, **खिंकाळणे** - घोड्यासारखे ओरडणे, **रागदारी** - शास्त्रीय संगीत, **गांजणे** - त्रास देणे, पीडा देणे, **झणी** - लवकर, **झडकरी** - लवकर.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१, ५.४.२)
  (१) राजा कोणावर जास्त विश्वास ठेवत असे ? (२) गवईबुवांनी राजाकडे कोणती मागणी केली ? (३) राजवाडा जळला, ही बातमी सेवक राजाला पटकन का सांगत नाही ? (४) राजाने आपली आज्ञा का मागे घेतली ?
- **दोन ते तीन वाक्यांत उत्तरे सांगा.** (५.४.१)
  (१) राजाचे प्रजेच्या सुखाकडे अजिबात लक्ष नव्हते, हे कशावरून वाटते ?
  (२) राजाला संगीताचे ज्ञान नव्हते, हे आपल्याला कशावरून दिसून येते ?
  (३) संगीताला उत्तेजन देण्यासाठी राजाने काय केले ?

(४) राजाची आज्ञा पाळणे लोकांना खूप त्रासदायक का वाटले ?

(५) तुम्हांला या पाठातील कोणत्या प्रसंगामुळे खूप हसायला येते ?

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा.** (५.४.१)

(१) 'जो कुणी गाण्यात बोलणार नाही त्याला शिक्षा करा.'

(२) 'तुमचा आवाज साखरेसारखा गोड आहे.'

(३) 'काय एकेकाचे आवाज भसाडे आहेत रे !'

(४) 'तुम्ही वांगी आणा छान सुरेख.'

(५) 'खड्ड्यात गेली ती आज्ञा.'

- **कोण ते सांगा.** (५.४.१)

(१) संगीतकलेसाठी काहीतरी करा, असे राजाला सांगणारा.

(२) दवंडी द्यायची व्यवस्था करणारा.

(३) 'अति तिथं माती' असे राजाला सांगणारा.

(४) 'नकोस खिंकाळू' असे म्हणणारा.

- **गाळलेल्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा.** (५.४.१)

(१) वा, ........................ तुमचा आवाज साखरेसारखा गोड आहे.

(२) आजपासून आमच्या राज्यात सगळ्यांनी ........................ बोलायचं.

(३) काय एकेकाचे आवाज ........................ आहेत रे !

(४) कमाल आहे बुवा ! ........................ गाण्यात करायचं !

(५) आमच्या ........................ हा सगळा घोटाळा झाला.

**(भांडणसुद्धा, गाण्यात, गवईबुवा, आज्ञेनं, भसाडे)**

- **तर काय झाले असते सांगा.** (५.४.१)

(१) गवई दरबारात आलाच नसता तर –

(२) राजवाड्याला आग लागलीच नसती तर –

(३) 'जो कोणी गाईल त्याला सुळावर चढवण्यात येईल,' ही महाराजांची आज्ञा त्यांनी रद्द केली नसती तर –

- **'जळाला' आणि 'जळून खाक झाला' यांच्या अर्थातील फरक समजावून घ्या.** (१.४.१)
- **शब्दसमूहाबद्दल शब्द लिहा.** (१.४.१)

**जसे —** गाणे म्हणणारा - **गायक**

वाद्य वाजवणारा - ..................

दवंडी देणारा - ..................

- **विरुद्ध अर्थाचे शब्द सांगा.**

श्रीमंत, कृपा, सुख, विजय, प्रिय, स्वच्छ, गद्य, गिऱ्हाईक, उधार, उपकार.

- **म्हणींचा संग्रह करा व वहीत लिहा.** (४.४.१)

व्याकरण : (६.४.१)

- **खालील वाक्ये वाचा.**

(१) आपला **राजवाडा** जळाला.

(२) मला छान **गोष्ट** सुचली.

(३) अहो ! येताना दोन शेर **वांगी** आणा.

(४) किल्ल्यावर अनेक **तोफा** आहेत.

वरील वाक्यांतील जाड अक्षरांतील नामे पाहा. 'राजवाडा' म्हणजे 'एक राजवाडा', 'गोष्ट' म्हणजे 'एक गोष्ट' हे लक्षात येते आणि 'वांगी' म्हणजे 'अनेक वांगी', 'तोफा' म्हणजे 'अनेक तोफा' हे लक्षात येते.

**वाक्यातील नामाच्या रूपावरून एकाचा बोध झाला, तर ते त्या नामाचे 'एकवचन', अनेकांचा बोध झाला, तर ते त्या नामाचे 'अनेकवचन'** होय.

वरील वाक्यांत 'राजवाडा' आणि 'गोष्ट' ही नामे एकवचनी आहेत, तर 'वांगी' आणि 'तोफा' ही नामे अनेकवचनी आहेत.

आता खालील वाक्ये वाचा.

(१) झाडावर **माकड** आहे.

(२) झाडावर **माकडे** आहेत.

वरील पहिल्या वाक्यातील जाड अक्षरातील 'माकड' हा शब्द नामाचे

एकवचन आहे. दुसऱ्या वाक्यातील जाड अक्षरातील 'माकडे' हा शब्द 'माकड' या नामाचे अनेकवचन आहे.

आता आणखी काही वाक्ये वाचा.

(१) सुधीर हा शंतनुचा **मित्र** आहे.

(२) प्रमोदला पुष्कळ **मित्र** आहेत.

वरील दोन्हीही वाक्यांत 'मित्र' हे नाम आले आहे. पहिल्या वाक्यात ते एकवचनी, तर दुसऱ्या वाक्यात ते अनेकवचनी आहे, हे त्या त्या वाक्यातील संदर्भावरून ओळखायचे असते.

अशाप्रकारे काही नामांचे एकवचनी रूप व अनेकवचनी रूप सारखेच असते.

आता अशा प्रकारचे आणखी एक उदाहरण पाहू.

मी पेरू खाल्ला, मी पेरू खाल्ले.

आता खालील वाक्य पाहा.

'गुरुजी वर्गात आले.' या वाक्यात **गुरुजी** ही व्यक्ती संख्येने एक आहे; पण त्यांच्याबद्दलचा आदर दाखवण्यासाठी त्यांचा उल्लेख अनेकवचनी केला आहे. याला 'आदरार्थी बहुवचन' म्हणतात.

- **खालील नामांची अनेकवचनी रूपे लिहा.**

पुस्तक, ढग, आंबा, घड्याळ, साधू, पोपट.

- **खालील वाक्यांतील जाड ठशांतील नामांचे वचन ओळखा व सांगा.**

(६.४.१)

(१) वाचनालयात खूप **पुस्तके** आणली.

(२) अनिलने **गाणे** म्हटले.

(३) भाऊने **कागद** आणला.

(४) आजीने मला **लाडू** दिले.

- **खालील नामांचा दोन्ही वचनी उपयोग करून वाक्ये तयार करा.**

हात, ससा, डोळा, विद्यार्थी.



# १६. सायंकाळची शोभा

पिवळे तांबुस ऊन कोवळे पसरे चौफेर
ओढा नेई सोने वाटे वाहुनिया दूर.

झाडांनी किति मुकुट घातले डोकिस सोनेरी
कुरणांवर शेतांत पसरला गुलाल चौफेरी !

हिरवे हिरवेगार शेत हे सुंदर साळीचे
झोके घेते कसे, चहुकडे हिरवे गालीचे !

सोनेरी, मख़मली, रुपेरी, पंख कितीकांचे
रंग किती वर तऱ्हेतऱ्हेचे इंद्रधनुष्याचे.

अशी अचल फुलपाखरे फुले साळिस जणु फुलती
साळीवर झोपली जणू का पाळण्यांत झुलती.

झुळकन् सुळकन् इकडुन तिकडे किति दुसरी उडती
हिरे, माणके, पाचू फुटुनी पंखचि गरगरती !

पहा पाखरे चरोनि होती झाडावर गोळा.
कुठे बुडाला पलीकडिल तो सोन्याचा गोळा ?

कवी - भा. रा. तांबे

२.४.२, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१

**मुकुट** - राजाच्या डोक्यावर घालावयाचा टोप, **कुरण** - गवताळ प्रदेश, **चौफेर** - चोहिकडे, चहूकडे, **साळीचे** - भाताचे, **मखमली** - मऊ, **रुपेरी** - चांदीसारख्या रंगाचे, **अचल** - स्थिर, न हालणारे, **हिरा** - पांढऱ्या रंगाचे मूल्यवान रत्न, **माणिक** - तांबड्या रंगाचे मूल्यवान रत्न.

कविता चालीवर म्हणता यावी, म्हणून कवितेत काही शब्दांतील अक्षरे ऱ्हस्व दिली आहेत; परंतु गद्यात लिहिताना ती खालीलप्रमाणे दीर्घ लिहावीत. (९.४.१)

**किती, इकडून, साळीस, चरोनी, पलीकडील, डोकीस**

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) झुळकन सुळकन असे कोण उडत आहेत ?
  (२) गुलाल कशाला म्हटले आहे ?
  (३) झोके कोण घेत आहे ?
  (४) फुलपाखरे कोठे झोपली आहेत ?

- **तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.१)
  (१) साळीचे शेत पाहून कवीला काय वाटले ?
  (२) पाखरे झाडावर का गोळा झाली होती ?
  (३) कवीला सायंकाळच्या वेळी निसर्गात कोणकोणते रंग दिसले ?

- **असे कवीने का म्हटले ते सांगा.** (५.४.१)
  (१) 'ओढा नेई सोने वाटे वाहुनिया दूर'
  (२) 'झाडांनी किति मुकुट घातले डोकिस सोनेरी'
  (३) 'हिरे, माणके, पाचू फुटुनि पंखचि गरगरती'
  (४) 'कुठे बुडाला पलीकडिल तो सोन्याचा गोळा ?'

- **ऊन, मुकुट, शेत, गालिचे, फुलपाखरे इत्यादींचे वर्णन करणारे कवितेतील शब्द शोधा.** (५.४.१)

- प्रत्यक्ष दृश्य आणि कविकल्पना यांच्या योग्य जोड्या जुळवा. (५.४.१)

| अ | ब |
| --- | --- |
| (१) झाडांच्या शेंड्यांवर पडलेले ऊन | साळीला आलेली फुले |
| (२) कुरणावर पसरलेले तांबूस कोवळे ऊन | सोनेरी मुकुट |
| (३) साळीचे शेत | गुलाल |
| (४) सूर्य | हिरवे गालिचे |
| (५) फुलपाखरे | सोन्याचा गोळा |

- काय करत आहेत सांगा. (५.४.१)
  पाखरे, साळीचे शेत, फुलपाखरे
- कवितेतील शेवटच्या दोन ओळींत 'गोळा' हा शब्द कोणत्या वेगवेगळ्या अर्थाने आला आहे ते सांगा. (९.४.१)
- जसे – तांबडा – तांबूस, तांबडा-लाल
  पांढरा – पांढुरका, पांढरा-शुभ्र
  तसे खालील रंगांबाबत सांगा.

निळा – .................. ..................

पिवळा – .................. ..................

काळा – .................. ..................

हिरवा – .................. ..................

लाल – .................. ..................

- ही कविता वर्गासमोर योग्य चालीवर म्हणा. (२.४.२)
- तुमच्या परिसरातील एखाद्या शांत ठिकाणी जाऊन सूर्यास्त पाहा आणि त्या वेळच्या दृश्यांचे आठ ते दहा वाक्यांत वर्णन लिहा. (४.४.३)



## १७. गोविंदपूल

एक छोटेसे गाव होते. डोंगराच्या कुशीत वसलेले. कुठेही जायचे झाले तरी एक-दोन दरडी चढून-उतरून जावे लागे. गावात पंचवीस-तीस घरे होती. घरे कसली झोपड्याच त्या. अशाच एका झोपडीत गोविंदा नावाचा एक मुलगा राहत होता. असेल दहा-अकरा वर्षांचा.

पाच वर्षांपूर्वी नदीला अचानक पूर आला. त्या पुरात गोविंदाचे वडील वाहून गेले. त्यामुळे गोविंदा आणि त्याची आई असे दोघेजणच झोपडीत राहायचे. गोविंदाची आई शेतमजुरी किंवा अशीच काही बारीकसारीक कामे करायची. गोविंदा रोज शाळेत जायचा. गोविंदा लहान होता; पण त्याला खूप समज होती. तो शाळेतला अभ्यास तर मन लावून करायचाच, शिवाय आईलाही घरकामात मदत करायचा. आई त्याला नेहमी सांगायची, 'गोविंदा, मला मदत करतोस हे चांगलंच आहे; पण आपण इतरांनाही मदत करावी. केलेली मदत कधी वाया जात नाही बघ.' गोविंदाला वाटायचे, आपण तर लहान, इतरांना कशी काय मदत करायची ?

गोविंदाची शाळा त्याच्या गावापासून दोन-तीन किलोमीटर अंतरावर होती. गावातली सारी मुले शाळेला चालत जात. शाळेच्या वाटेवर एक छोटासा ओढा होता. आठ ते नऊ महिने तो कोरडा ठणठणीत असायचा; परंतु पावसाळा आला, की त्यातून लालभडक पाणी दुथडी भरून वाहत असायचे. पाण्याला ओढ तर एवढी असायची, की मोठ्या माणसाचाही पाण्यात पाय ठरायचा नाही. त्यातच एखादया गोल गोट्यावर पाय पडला आणि तो गोटा सरकला, की माणूस धारेत वाहत चाललाच म्हणून समजा !

३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ६.४.१, ९.४.१

दरवर्षी पावसाळा आला, की गोविंदाची आई धसकाच घ्यायची. कधी एकदा पावसाळा संपतो, असे तिला वाटायचे. आईने गोविंदाला बजावून ठेवले होते, 'ओढ्याला पाणी आलं, की ओढ्यात पाय नाही टाकायचा.'

आईची ही सूचना गोविंदाने आजपर्यंत तंतोतंत पाळली होती. आता तो पाचवीत आला होता. ओढ्याला पाणी आले, की त्याला शाळेला जाता येत नसे. त्यामुळे अभ्यास मागे राही. यावर काय मार्ग काढावा, हेच गोविंदाला कळत नव्हते. एके दिवशी गावातला पाच-सहा वर्षांचा एक मुलगा ओढा ओलांडताना पाण्यात वाहून जाऊ लागला, तेव्हा लोकांनी त्याला पाण्यातून वर काढले. बुडता बुडता तो वाचला. त्यामुळे ओढ्यावर पूल बांधायला हवा अशी जोरदार चर्चा लोकांत सुरू झाली; पण पाऊस थांबला तशी चर्चाही थांबली.

गोविंदा या घटनेने अस्वस्थ झाला. त्याने गावातल्या वडीलधाऱ्या माणसांकडे पुलाचा प्रश्न काढला; पण त्याचे म्हणणे कोणीच मनावर घेतले नाही. मोठी माणसे यात लक्ष घालणार नाहीत.



आपण मुलांनीच पुढे येऊन काहीतरी करायला हवे हे गोविंदाच्या लक्षात आले.

गोविंदा शाळेतल्या निरनिराळ्या कार्यक्रमांत, उपक्रमांत नेहमी भाग घ्यायचा. विज्ञान प्रदर्शनातही त्याने नुकताच भाग घेतला होता. युद्धाच्या वेळी नदीवर घडीचा लोखंडी पूल उभारतात. तसाच छोटा पूल त्याने पुस्तकात पाहून तयार केला होता. त्याला प्रदर्शनात बक्षीसही मिळाले होते. गोविंदाचे सर्वांनी कौतुक केले होते.

युद्धाच्या वेळी घडीचा पूल वापरतात, तो लोखंडी असतो. आपण लाकडाचा करू, म्हणजे तो या पावसाळ्यात तरी उपयोगी पडेल. येत्या उन्हाळ्यातील सुटीत असा पूल तयार करायचाच असा गोविंदाने विचार केला आणि त्याने ही कल्पना आपल्या मित्रांच्या कानांवर घातली. सुरवातीस त्यांना ती अवघड वाटली; पण गोविंदाने त्यांच्या एकेक शंका दूर केल्यावर त्यांनी प्रयोग करून पाहण्यास संमती दिली.

गोविंदाची कल्पना अगदी साधी, सोपी होती. एक लांब-रुंद शिडी तयार करायची. तिला दोन्ही बाजूंनी हात धरण्यासाठी आधार द्यायचे आणि ओढ्यावर योग्य त्या ठिकाणी दोन्ही तीरांवर ती शिडी ठेवायची की झाला पूल.

एके दिवशी गोविंदा व त्याचे मित्र ओढ्यापाशी गेले. पाहणी करून त्यांनी पुलासाठी जागा नक्की केली. गोविंदाच्या घरामागे पोफळीचे दोन सोट खूप दिवस पडून होते. शिवाय जवळच बांबूचे बेट होते. पुलासाठी त्या बांबूंचा व पोफळीच्या सोटांचा उपयोग करण्याचे गोविंदाने ठरवले.

दुसऱ्या दिवशी त्या मुलांनी दोन सोट खांद्यावरून ओढ्याजवळ नेले. तिसऱ्या दिवशी बांबू नेण्यात आले. गोविंदाच्या घरात हातोडी, लहान-मोठे खिळे होते. त्यांचा पूल तयार करण्यासाठी उपयोग

करायचा असे ठरले. गोविंदा मार्गदर्शन करायचा आणि मित्र त्याप्रमाणे काम करायचे. पंधरा दिवसांत हा पूल तयार झाला.

मे महिन्याचा शेवटचा आठवडा उजाडला. पाऊस पंधरवड्यावर आला होता. पूल ओढ्यावर वेळीच ठेवून त्याची चाचणी घ्यायला हवी होती. त्यासाठी गोविंदाने शनिवार नक्की केला. शनिवारी सकाळी गोविंदा आणि त्याचे मित्र तयार केलेल्या पुलापाशी गोळा झाले. आता पूल सरकवत सरकवत नेऊन त्याची एक बाजू ओढ्याच्या दुसऱ्या दरडीवर ठेवायची. हे खरे अवघड काम होते; पण गोविंदा कल्पक होता. त्याने दोन लहान ओंडके पुलाच्या खाली घातले आणि त्यांवरून पूल सरकवत सरकवत पुढे नेला. काही मुले ओढ्यात उतरली. त्यांनी तो पूल थोडा ओढून घेतला आणि त्याची दुसरी बाजू पलीकडच्या दरडीवर ठेवली. पाण्याने दरडी कोसळू नयेत; म्हणून दोन्ही तीरांवर पुलाखाली दगड रचले. गोविंदा पुलावरून हलकेच पलीकडे गेला आणि त्याच्या वानरसेनेने गोविंदाच्या नावाने जयजयकार केला.



जयजयकार कसला, ते पाहण्यासाठी म्हणून चार-दोन गावकरी ओढ्याकडे धावले. बघतात तो ओढ्यावर पूल आणि गोविंदा व त्याचे मित्र दोन्ही बाजूंना उभे. लोकांना आश्चर्य वाटले. ही बातमी हां हां म्हणता गावात पसरली. जो तो हातचे काम टाकून पूल बघायला येऊ लागला. साऱ्या गावाने गोविंदा आणि त्याच्या मित्रांची पाठ थोपटली. गोविंदाचे गुरुजी मुद्दाम पूल पाहायला आले. त्यांनाही आश्चर्य वाटले. मोठ्यांनाही जे जमले नाही, ते या मुलांनी केले ! गुरुजींनी ही बातमी सरपंचांच्या कानांवर घातली. ग्रामपंचायतीने सरपंचांच्या हातून त्या पुलाचे उद्‌घाटन केले. त्यावेळी गोविंदाचा सत्कार करण्यात आला. ग्रामपंचायतीने हातभार लावून पूल ठाकठीक करून घेतला आणि त्या पुलाला 'गोविंदपूल' असे नाव ठेवले.

त्यावेळी बोलताना गुरुजी म्हणाले, "हा पूल किती टिकाऊ आणि भक्कम आहे, हा प्रश्न गौण आहे. आपला प्रश्न आपणच सोडवायचा ही यामागची भावना अधिक महत्त्वाची आहे."

गोविंदाचे होत असलेले कौतुक पाहून त्याची आई भारावून गेली. तिने गोविंदाला पोटाशी धरले आणि विचारले, "गोविंदा, तुला हे सुचलं तरी कसं ?"

गोविंदा म्हणाला, "आई, तूच नेहमी म्हणायचीस ना, की इतरांनाही मदत करावी म्हणून ! त्यातूनच मला ही कल्पना सुचली."

छोटासाच का होईना, पण गोविंदपूल उभा राहिला आणि शाळेला जाण्यातील मुलांची एक अडचण दूर झाली.

लेखक - द्‌वारकानाथ लेले



**दरड** - नदीचा उंच तीर, कड, **दुथडी** - दोन्ही काठ, **धसका** - भीतीचा धक्का, **बजावणे** - ठासून सांगणे, **तंतोतंत** - हुबेहूब, पूर्णपणे, **मनावर**

**घेणे** - एखादी गोष्ट करण्याचे ठरवणे, ठाम निर्णय घेणे, **पोफळीचे सोट** - सुपारीच्या झाडाचे लांब सरळ खोड, **पाठ थोपटणे** - शाबासकी देणे, **भक्कम** - मजबूत, **गौण** - कमी महत्त्वाचा.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.** (५.४.१)
  (१) गोविंदाची आई त्याला नेहमी काय सांगायची ?
  (२) गोविंदा अस्वस्थ का झाला ?
  (३) 'आपण मुलांनीच पुढे येऊन काहीतरी करायला हवं' असे गोविंदाला का वाटले ?
  (४) पूल बांधण्याची कल्पना गोविंदाला कशामुळे सुचली ?
  (५) सरपंचांनी त्या पुलाला 'गोविंदपूल' असे नाव का दिले ?
- **गोविंदा आणि त्याचे मित्र यांनी ओढ्यावर पूल बांधण्यासाठी काय काय केले ? दहा ते पंधरा वाक्यांत लिहा.** (४.४.३)
- **का ते सांगा.** (५.४.२)
  (१) कधी एकदा पावसाळा संपून जातो, असे गोविंदाच्या आईला होऊन जायचे.
  (२) गोविंदाचा अभ्यास मागे राही.
  (३) गोविंदाचा सत्कार करण्यात आला.
- **खालील शब्दांचे अर्थ समजावून घ्या. त्यांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)
  अचानक, दुथडी, कल्पक, गौण.
- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)
  धसका घेणे, अस्वस्थ होणे, कानांवर घालणे, सुरुवात करणे, भारावून जाणे, हातभार लावणे.
- **सर्वांना उपयोगी पडेल असे काम तुमच्या परिसरात कोणी केलेले असल्यास त्याची माहिती मिळवा. त्या माहितीच्या आधारे दोन परिच्छेद लिहा.** (४.४.३)

**व्याकरण : (६.४.१)**

■ **खालील वाक्यांतील नामे पाहा.**

(१) **गोविंदा** झोपडीत राहत होता.

(२) शाळेच्या वाटेवर **ओढा** होता.

(३) गावाजवळून **नदी** वाहत होती.

(४) ही **बातमी** गावात पसरली.

(५) गोविंदाजवळ **पुस्तक** होते.

(६) गोविंदाच्या शाळेत **प्रदर्शन** भरले होते.

वरील वाक्यांत गोविंदा, ओढा, नदी, बातमी, पुस्तक, प्रदर्शन ही नामे आली आहेत. आता या नामांचे लिंग पाहू.

| | | |
|---|---|---|
| गोविंदा | तो गोविंदा | पुल्लिंग |
| ओढा | तो ओढा | पुल्लिंग |
| नदी | ती नदी | स्त्रीलिंग |
| बातमी | ती बातमी | स्त्रीलिंग |
| पुस्तक | ते पुस्तक | नपुसकलिंग |
| प्रदर्शन | ते प्रदर्शन | नपुसकलिंग |

प्राण्यांतील पुरुषाचा वा नराचा उल्लेख 'तो' या शब्दाने केला जातो. स्त्रीचा वा मादीचा उल्लेख 'ती' या शब्दाने केला जातो. एखाद्या शब्दातून स्त्री अथवा पुरुष जातीचा बोध होत नसेल, तेव्हा त्याचा उल्लेख 'ते' या शब्दाने केला जातो.

काही वस्तू वा पदार्थांचे लिंग कल्पनेने/रूढीने ठरवून दिलेले असते. उदा. **'तो'** पर्वत, **'ती'** नदी, **'ते'** पाणी.

'तो', 'ती', 'ते' या सर्वनामांच्या मदतीने नामांचे लिंग ओळखता येते.

'गोविंदपूल' पाठातील काही शब्दांचे लिंग पाहा.

(१) पूल, मित्र, मुलगा, पावसाळा, महिना – पुल्लिंग

(२) ग्रामपंचायत, आई, कल्पना, शिडी, हातोडी – स्त्रीलिंग

(३) युद्‌ध, पुस्तक, बक्षीस, लाकूड – नपुसकलिंग

- खालील शब्दांचे 'पुल्लिंगी', 'स्त्रीलिंगी' व 'नपुसकलिंगी' असे लिंगांनुसार तीन गट तयार करा.

  विमल, मुंगी, साप, प्राणी, माती, मूल, विंचू, अक्षर, वासरू, दरवाजा, वार्ता, घर

- खाली 'शब्द' आणि 'लिंग' यांच्या जोड्या दिलेल्या आहेत. त्यांतील चुकीच्या जोड्या शोधून त्यांत योग्य त्या दुरुस्त्या करा.

  (१) भोपळा - पुल्लिंग
  (२) वही - नपुसकलिंग
  (३) जांभूळ - नपुसकलिंग
  (४) पक्षी - पुल्लिंग
  (५) भिंत - स्त्रीलिंग
  (६) चहा - नपुसकलिंग
  (७) बदक - नपुसकलिंग
  (८) भाऊ - पुल्लिंग
  (९) वीट - पुल्लिंग
  (१०) वाडा - स्त्रीलिंग





# १८. नेताजी सुभाषचंद्र बोस



दुसऱ्या महायुद्धाचे ते दिवस होते. इंग्रज सरकारच्या सैन्यात हजारो सैनिक भारतीय होते. भारतीय असूनही ते लढत मात्र होते इंग्रजांच्या बाजूने! देशभक्त सुभाषचंद्र बोस यांना या गोष्टीचे फार वाईट वाटे. भारतीय सैनिकांनी भारत स्वतंत्र करण्यासाठीच लढायला हवे. त्यासाठी आपल्या भारतीय सैनिकांची मने वळवायला हवीत, असा त्यांनी निश्चय केला.

सुभाषचंद्रांच्या सर्व हालचालींवर इंग्रज सरकारची करडी नजर होती. इंग्रज सरकारला मोठ्या शिताफीने चकवून सुभाषचंद्र भारताच्या पूर्वेकडील देशांत गेले. तेथील भारतीय सैनिकांना भारताच्या बाजूने लढण्याची त्यांनी प्रेरणा दिली. भारतीय सैनिकांच्या मनात देशप्रेमाची ज्योत पेटवली. हजारो भारतीय सैनिक इंग्रजांच्या चाकरीतून बाहेर पडले. अशा सर्व सैनिकांना घेऊन रासबिहारी बोस यांनी त्याचवेळी आझाद हिंद सेनेची स्थापना केली होती. या सेनेचे नेतृत्व सुभाषचंद्रांनी केले. सर्व सैनिक त्यांना 'नेताजी' म्हणू लागले.

'आझाद हिंद सेने'चे विशेष म्हणजे या सेनेमध्ये अनेक स्त्रियाही सामील झाल्या होत्या. अशा स्त्रीसैनिकांची एक स्वतंत्र

३.४.१, ३.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१

तुकडी करून कॅप्टन लक्ष्मी यांना त्या तुकडीच्या प्रमुख करण्यात आले. तिला 'झाशीची राणी पथक' असे नाव देण्यात आले. सर्व सैनिकांची जडणघडण नेताजी खूप कष्टाने जाणीवपूर्वक करत होते. सैनिकांसमोर नेताजी बोलू लागले, की सैनिकांच्या रोमारोमांत वीरश्री संचारू लागे. सुभाषबाबू म्हणत, "बंधूंनो आणि भगिनींनो ! आपली मातृभूमी स्वतंत्र झालीच पाहिजे. आपली मागणी आहे ती स्वातंत्र्याची. ही स्वतंत्रता सहज मिळेल असं तुम्हांला वाटतं ? नाही. त्यासाठी देशाला हवंय बलिदान. सर्वस्वाचं बलिदान."





एकदा नेताजी सभेत श्रोत्यांना म्हणाले, ''तुम मुझे खून दो, मैं तुम्हें आजादी दूँगा !'' आणि काय आश्चर्य ! हजारो युवकांचे हात वर झाले. नेताजींना समाधान वाटले; पण एवढ्यावर ते थांबले नाहीत. ते म्हणाले, ''नुसते हात वर करून चालायचं नाही. प्रत्येकाने प्रतिज्ञापत्रावर स्वतःच्या रक्ताने सह्या केल्या पाहिजेत.'' युवकांनी आपल्या रक्ताने प्रतिज्ञापत्रांवर सह्या केल्या. नेताजींच्या जयजयकारांनी सभा दणाणून गेली.

जानेवारी २६, १९४४ चा दिवस. रंगून येथे नेताजींनी भारताचा स्वातंत्र्यदिवस साजरा केला. जंगी सभा झाली. दूरवरून हजारो लोक त्या सभेला आले होते. सभा सुरू होण्यापूर्वी नेताजींना अनेकांनी हार घातले. सभेतील त्यांच्या स्फूर्तिदायक भाषणाने तरुण भारावून गेले. भारतीय स्वातंत्र्याचा जयजयकार सुरू झाला.

भाषण संपताच नेताजींनी एक हार आपल्या हातात घेतला आणि म्हणाले, ''बोला, काय मोल द्याल तुम्ही याचं ?'' सवाल

आणि बोली सुरू झाली. सभेला आलेल्या एका युवकाचे डोळे हारावर खिळले होते. पडेल ती किंमत देऊन तो हार घ्यायचाच असे त्याने ठरवले. बोली वाढू लागली. क्षणात तो युवक उठला आणि म्हणाला, "माझी सर्व संपत्ती या हारासाठी मी अर्पण करतो !" सुभाषबाबू म्हणाले, "असं करू नको. आपल्या उपजीविकेसाठी तरी काही राखून ठेव." यावर तो तरुण उद्‌गारला, "नाही, नाही, नेताजी, असं होणार नाही. मी स्वत:च आझाद हिंद सेनेत दाखल होणार आहे, तेव्हा माझ्यासाठी वेगळं काय राखून ठेवायचं ?"

आझाद हिंद सेनेने स्वतंत्र भारताचे सरकार स्थापन केले होते. त्याच्या पहिल्या वाढदिवशी महिलांनी नेताजींची दागिन्यांनी तुला करण्याचे ठरवले. यात मिळणारी सर्व संपत्ती स्वातंत्र्यलढ्यासाठी उपयोगी पडणार होती. एक मोठा तराजू फुलांनी सजवण्यात आला. स्त्रियांनी नेताजींना ओवाळले. नेताजी एका पारड्यात बसले. जमलेल्या स्त्रिया आपल्या अंगावरील दागिने काढून दुसऱ्या पारड्यात टाकू लागल्या. इंग्रजांशी लढता लढता आपला पती मरण पावला



म्हणून एका तरुण स्त्रीने आपले मंगळसूत्र त्या पारड्यात टाकले. थोड्या वेळाने दोन्ही पारडी सारखी होऊ लागली; पण दागिने ठेवलेल्या पारड्याचे वजन अजूनही थोडे कमीच भरत होते.

इतक्यात नवलच घडले — एक वृद्ध स्त्री पुढे आली. तिच्या हातात एक सोन्याची फ्रेम होती. त्या फ्रेममध्ये एका तरुणाचा फोटो होता. हा फोटो तिने प्राणापेक्षा अधिक जपला होता. एकवार तिने तो फोटो हृदयाशी धरला. क्षणभर डोळे मिटले आणि फोटो पारड्यात टाकला. वजन पुरेपूर भरले. त्या वृद्ध स्त्रीच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले; कारण पूर्वी नेताजींनी हाक दिल्यावर याच स्त्रीने आपला एकुलता एक मुलगा नेताजींच्या सेनेत पाठवला होता. त्याच मुलाचा फोटो असलेली फ्रेम आज ती घेऊन आली होती. ती फ्रेम पाहून नेताजींचे हृदय भरून आले. ते म्हणाले, "माताजी, तुम्ही धन्य आहात. ज्या देशातल्या स्त्रिया असा सर्वस्वाचा त्याग करतात, तो देश स्वतंत्र होणारच !"



**करडी नजर** - कठोर नजर, **शिताफीने** - युक्तीने, **कॅप्टन** - सैन्यातील एक हुद्दा, **जडणघडण** - घडवणे, **वीरश्री** - शौर्याचा उत्साह.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.४.१)
  (१) सुभाषचंद्र बोस यांनी भारतीय सैनिकांना कोणती प्रेरणा दिली ?
  (२) सुभाषचंद्र बोस यांनी नेतृत्व केलेल्या संघटनेचे नाव काय होते ?
  (३) सर्व सैनिक सुभाषचंद्र बोस यांना कोणत्या नावाने संबोधत ?
  (४) नेताजी सैनिकांसमोर बोलू लागताच सैनिकांवर कोणता परिणाम होई ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) सुभाषचंद्र बोस यांना कोणत्या गोष्टीचे वाईट वाटत होते ?
  (२) सुभाषचंद्र बोस यांनी कोणता निश्चय केला ? का केला ?

(३) सुभाषचंद्र बोस यांनी कोणती घोषणा केली ? त्या घोषणेचा परिणाम काय झाला ?

(४) आझाद हिंद सेनेचा पहिला वाढदिवस कशा प्रकारे साजरा करण्यात आला ?

- **असें कोणी, कोणास म्हटले ते सांगा.** (५.४.१)

(१) ''माझी सर्व संपत्ती या हारासाठी मी अर्पण करतो.''

(२) ''ज्या देशातल्या स्त्रिया असा सर्वस्वाचा त्याग करतात, तो देश स्वतंत्र होणारच !''

- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)

करडी नजर असणे, वीरश्री संचारणे, रक्त देणे, प्राणापेक्षा जपणे, सर्वस्वाचा त्याग करणे

- **या पाठातील तुम्हांला आवडलेला प्रसंग कोणता ते सांगा.** (३.४.१)

- **देश स्वतंत्र करण्यासाठी ज्या थोर व्यक्तींनी प्रयत्न केले, त्यांची चित्रे जमवा व माहिती मिळवा. माहितीची भित्तिपत्रके तयार करा. वर्गात त्यांचे वाचन करा.** (३.४.१)

- **खालील वाक्यांमध्ये एकच शब्द वेगवेगळ्या अर्थाने वापरला आहे. त्याचा अर्थ समजून घ्या.** (९.४.१)

(१) नेताजींना अनेकांनी **हार** घातले.

(२) लढाईत **हार** मानणे, हे सैनिकांना आवडत नाही.

(३) नेताजींची दागिन्यांनी **तुला** करण्याचे ठरवले.

(४) नेताजींनी **तुला** सांगितल्याप्रमाणे देशाची सेवा कर.

- **सुभाषचंद्र बोस यांना 'नेताजी' असेही म्हणतात. तसे खालील व्यक्तींना काय म्हणतात ?** (९.४.१)

(१) मोहनदास करमचंद गांधी

(२) बाळ गंगाधर टिळक

(३) वल्लभभाई पटेल



# १९. प्रमाण

अती कोपता कार्य जाते लयाला
अती नम्रता पात्र होते भयाला
अती काम ते कोणतेही नसावे
प्रमाणामधे सर्व काही असावे

अती भूषणे मार्ग तो संकटाचा
अती थाट तो वेष होतो नटाचा
रहावे असे की न कोणी हसावे
प्रमाणामधे सर्व काही असावे

स्तुतीला अती बोलती श्वानवृत्ती
अती लोकनिंदा करी दुष्टचित्ती
न कोणा उगे शब्द स्पर्शे डसावे
प्रमाणामधे सर्व काही असावे

जुन्याचे अती भक्त ते हट्टवादी
नव्याचे अती लाडके शुद्ध नादी
खरे सार शोधोनिया नित्य घ्यावे
प्रमाणामधे सर्व काही असावे

कवी - कृष्णाजी नारायण आठल्ये



**कोपणे** - रागावणे, **लय** - शेवट, नाश, **पात्र** - लायक, **भय** - भीती, **भूषणे** - दागिने, **वेष** - पोषाख, **श्वानवृत्ती** - कुत्र्यासारखा स्वभाव, **उगे** - उगीच, **डसणे** - चावणे, **नादी** - छांदिष्ट, **नित्य** - नेहमी.

२.४.२, ३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१

## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) अतिशय रागावल्यावर काय होते ?
  (२) पुष्कळ अलंकार असणे कशाचा मार्ग ठरतो ?
  (३) अति स्तुतीला काय म्हटले जाते ?
  (४) नेहमी कोणत्या गोष्टींचा शोध घ्यावा ?

- **खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) कोणकोणत्या गोष्टी प्रमाणात असाव्या असे कवीला वाटते?
  (२) कोणत्या गोष्टींच्या अतिरेकाचे काय काय परिणाम होतात ?

- **खालील शब्दांना समानार्थी शब्द सांगा.** (९.४.१)
  कोप, लय, भय, भूषणे, वेष, श्वान, इष्ट

- **विरुद्धार्थी शब्द लिहा.** (९.४.१)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| दुष्ट | x | .................. | जुने | x | .................. |
| नम्र | x | .................. | आळशी | x | .................. |
| निंदा | x | .................. | हसणे | x | .................. |

- **'अति तेथे माती' या म्हणीच्या आधारे गोष्ट सांगा.** (४.४.३)

- **'रहावे असे की न कोणी हसावे' या ओळीतील अर्थ समजून तुमच्या शब्दांत लिहा.** (४.४.३)

- **पुढीलपैकी कोणत्या गोष्टी तुम्ही 'अति' करता ? कोणत्या गोष्टी प्रमाणात करायला हव्यात ? कोणत्या करू नयेत ? ते सांगा.** (५.४.१, ५.४.२)

| | | |
|---|---|---|
| खेळ | हट्ट | भांडण |
| खाणे | झोपणे | निंदा |

- **संत रामदासांनी लिहिलेले 'मनाचे श्लोक' मिळवून वाचा.** (३.४.३)



# २०. माझ्या आठवणी



माझं आजचं आयुष्य इतरांच्या मानानं फार वेगळं आहे. माझं बालपणदेखील माझ्या वयाच्या इतर मुलामुलींहून अगदी निराळंच होतं.

मी जेमतेम तेरा वर्षांची असेन, तेव्हा माझे वडील दिवंगत झाले आणि माझी आई व आम्ही पाच भावंडं पोरकी झालो. नातेवाईकांचा आधार नाही, स्नेही मंडळींचा मदतीचा हात नाही, पैशाचं पाठबळ नाही, अशा अवस्थेत घरातली थोरली मुलगी या नात्यानं आपली आई व आपली धाकटी भावंडं यांचा सांभाळ करण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. इतरांसारखं माझं शालेय शिक्षण कधीच झालं नाही. मात्र गाण्याच्या शिक्षणाचा लाभ मला फार लहान वयापासून झाला. माझे बाबा - मास्टर दीनानाथ मंगेशकर हे सुप्रसिद्ध नट आणि गायक होते. माझा सुरेल आवाज ध्यानात घेऊन त्यांनी वयाच्या सहाव्या वर्षीच माझ्या हाती तंबोरा दिला आणि शास्त्रीय संगीताचे पाठ मला द्यायला सुरुवात केली.

२.४.२, ३.४.३, ४.४.३, ५.४.१, ५.४.२, ९.४.१



बाबा हेच या क्षेत्रातले माझे पहिले गुरू. बाबांनी मला अनेक राग, अनेक चिजा शिकवल्या. त्यावेळी गाणं हाच माझा छंद होता. बाबा गेल्यानंतर हा छंद माझ्या साहाय्याला धावून आला. ते गेल्यानंतर आई व माझी भावंडं यांची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. त्यासाठी माझी कलाच माझ्या उपयोगी पडली.

मी 'प्रफुल्ल' या चित्रपट कंपनीत काम करण्यासाठी कोल्हापूरला आले आणि तिथंच स्थायिक झाले. कंपनीत माझा भटकेपणा सारखा चालू असे. कंपनीच्या कोणत्याही विभागात मी मोकळेपणानं वावरत असे. तिथं मला विविध प्रकारची कामं करावी लागत असत. दुपारी सवड मिळाली, की मी एखाद्या विभागात जाऊन बसे. वाचनाचं जबरदस्त वेड मला याच काळात लागलं. खांडेकर आणि सानेगुरुजी हे त्या काळातले माझे फार आवडते लेखक होते. या काळातल्या माझ्या सर्व आठवणी कोल्हापूरशी, तिथल्या माझ्या जीवनाशी निगडित आहेत. गतकालातले हे दिवस नेहमीच मनात एक गोड हुरहूर निर्माण करतात.

बाबूराव पेंटरांचं घर आमच्या शेजारीच होतं. बाबूरावांच्या मुली वागायला फार चांगल्या. थोरल्या कुमुदचं आणि माझं विशेष जमे. तिला मी ताई म्हणत असे. ताई माझ्यावर फार लोभ करी. स्टुडिओत एखादा विशेष कार्यक्रम असला, की ताई आठवणीनं आपला झगा मला घालायला देई. एके दिवशी ताईनं आपला गरम कोट मला घालायला दिला. तपकिरी रंगाचा तो कोट मला अगदी ठीक येई. नंतर तो कोट मी जवळजवळ नेहमीच वापरू लागले. ते घर सोडून आम्ही दुसरीकडं राहायला गेलो. घर सोडताना ताईचा कोट मी तिला परत द्यायला गेले; पण तिनं तो घेतला नाही. ती मला म्हणाली, ''लता, तुलाच राहू दे तो कोट. माझ्यापेक्षा तुला त्याची गरज जास्त आहे.''

पुढल्या आयुष्यात मी कितीतरी भारी भारी, सुंदर कोट स्वत:साठी शिवून घेतले; पण ताईनं आत्यंतिक प्रेमानं व जिव्हाळ्यानं दिलेल्या त्या कोटाची आठवण मी कधी विसरणार नाही.

कोल्हापूरला असताना आमची परिस्थिती तशी बिकटच होती. कंपनीत मला जो पगार मिळे त्यावर आमचं घर चाललं होतं. कोल्हापुरात आल्यावर आशा, मीना, उषा यांना मी शाळेत घातलं. मी सतत त्यांना सांगे, ''परिस्थितीमुळे मी शिकले नाही, पण तुम्ही शिका.'' शिक्षणाबद्दल मला आस्था वाटे. त्याचं महत्त्व मला जाणवे. पोरकेपणामुळं आपली भावंडं अशिक्षित राहू नयेत हीच माझी इच्छा होती.



**दिवंगत झाले** - निधन पावले, **स्नेही** - सोबती, मित्र, **पाठबळ** - मदत, **राग** - संगीतातील विशिष्ट स्वररचना, **चिजा** - संगीतातील राग गाण्यासाठी तयार केलेली गाणी, **निगडित** - संबंधित, **गतकाल** - मागील काळ, (**बाबूराव पेंटर** - बाबूराव कृष्णाजी मिस्त्री (मेस्त्री) - प्रसिद्ध चित्रकार, शिल्पकार, चित्रपट निर्माते व दिग्दर्शक)



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे सांगा.** (५.४.१)
  (१) संगीत शिकवणारे लता मंगेशकरांचे पहिले गुरू कोण होते ?
  (२) आईचा व भावंडांचा सांभाळ करण्यासाठी लताबाईंना कोणती गोष्ट उपयोगी पडली ?
  (३) लताबाईंचे आवडते लेखक कोणकोण होते ?
- **खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.** (५.४.२)
  (१) लता मंगेशकर यांच्यावर घराची जबाबदारी का पडली ?
  (२) 'मी शिकले नाही; पण तुम्ही शिका' असे लताबाई आपल्या भावंडांना का म्हणत ?
- **का ते सांगा.** (५.४.२)
  (१) लता मंगेशकर यांचे शालेय शिक्षण झाले नाही.
  (२) बाबांनी वयाच्या सहाव्या वर्षीच लताच्या हाती तंबोरा दिला.
  (३) लता मंगेशकर यांचे घर कोल्हापूरला आले.
- **खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.** (९.४.१)
  पोरकी होणे. आधार नसणे, पाठबळ नसणे, सांभाळ करणे.
- **संगीतविषयक कोणकोणते शब्द या पाठात आलेले आहेत ?** (९.४.१)
- **तुम्हांला कोणता छंद आहे ? तो जोपासण्यासाठी तुम्ही काय कराल ? दहा ते पंधरा वाक्यांत लिहा.** (४.४.३)
- **लता मंगेशकर यांच्या आवाजातील एखादे गीत म्हणून दाखवा.** (२.४.२)
- **लता मंगेशकर यांच्या गाण्याची ध्वनिफीत ऐका.** (२.४.२)
  (देशभक्तिपर / भावगीत / भक्तिगीत)
- **तुम्हांला माहीत असलेल्या विविध वाद्यांच्या नावांची यादी करा, त्यांची चित्रे जमवा.** (९.४.१)
- **शाळेतल्या तुमच्या आठवणी दहा ते पंधरा वाक्यांत लिहा.** (४.४.३)



# २१. अभंग



चंदनाचे हात पायही चंदन ।
परिसा नाही हीन कोणी अंग ।।
दीपा नाही पाठी पोटी अंधःकार ।
सर्वांगे साकर अवघी गोड ।।
तुका म्हणे तैसा सज्जनापासून ।
पाहतां अव-गुण मिळेचि ना ।।

●●●

अर्थेविण पाठांतर कासया करावें ।
व्यर्थचि मरावें घोकूनियां ।।
घोकूनियां काय वेगीं अर्थ पाहे ।
अर्थरूप राहे होऊनियां ।।
तुका म्हणे ज्याला अर्थीं आहे भेटी ।
नाहीं तरी गोष्टी बोलों नका ।।

कवी - संत तुकाराम

२.४.२, ४.४.१, ५.४.१, ५.४.२



**हीन** - कमी दर्जाचा, **अवघी** - सगळी, संपूर्ण, **अवगुण** - दुर्गुण, **कासया** - कशाला, **व्यर्थ** - विनाकारण, **वेगी** - वेगाने, लवकर, **परिस** - लोखंडाचे सोने करणारा काल्पनिक दगड. परिसाच्या कुठल्याही बाजूचा स्पर्श लोखंडाचे सोने करतो, म्हणून परिसाचे कोणतेच अंग टाकावू नाही.



## स्वाध्याय

- **खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या.** (५.४.१)
  (१) परिसाला एवढे महत्त्व का आहे ?
  (२) साखरेचा कोणता गुण तुकाराम महाराजांनी सांगितला आहे ?
  (३) सज्जन माणसाविषयी तुकाराम महाराज काय म्हणतात ?
  (४) कोणत्या प्रकारच्या पाठांतराला महत्त्व नसते ?
- **अर्थ सांगा.** (५.४.१)
  'सर्वांगे साकर अवघी गोड'
- **'दिव्याच्या कोणत्याही भागात अंधार नाही,' असा अर्थ होणारी अभंगातील ओळ सांगा.** (५.४.१)
- **संत तुकाराम महाराजांनी दुसऱ्या अभंगाच्या शेवटच्या दोन ओळींत काय सांगितले आहे ?** (५.४.१)
- **पहिल्या अभंगाचा अर्थ तुमच्या शब्दांत वर्गासमोर उभे राहून सांगा.** (५.४.१)
- **हे अभंग पाठ करा आणि योग्य चालीवर वर्गात म्हणा.** (२.४.२)
- **वृक्षवल्लींच्या संदर्भातील तुकाराममहाराजांचा अभंग मिळवा. पाठ करा आणि वर्गात म्हणून दाखवा.** (२.४.२)



# नमुना चाचणी प्रश्न

इयत्ता पहिली आणि दुसरीच्या पाठ्यपुस्तकांत चार टप्प्यांवर नमुना चाचण्या दिल्या होत्या. इयत्ता चौथीच्या पाठ्यपुस्तकात शेवटी सबंध पाठ्यपुस्तकातील आशयावर आधारित नमुना प्रश्न दिले आहेत. वार्षिक नियोजनानुसार मूल्यापनासाठी घेण्यात येणाऱ्या चाचण्या आणि वार्षिक परीक्षेसाठी या नमुना प्रश्नांची शिक्षकांनी मदत घ्यावी आणि याच धर्तीवर अन्य व जादा प्रश्न तयार करावेत.

- **एका वाक्यात उत्तरे लिहा.** (५.४.१, ५.४.२)

(१) सुलभा सांकवावरून जाताना का बिचकत होती ?
(२) एडिसनला अमेरिकेत त्या काळी जादूगार का म्हणत ?
(३) चंद्रशेखर आझादांना फटक्यांची शिक्षा का दिली ?
(४) 'सायंकाळची शोभा' या कवितेत सोन्याचा गोळा कोणाला म्हटले आहे ?
(५) सगळे शेत हिरवेगार केव्हा दिसते ?
(६) देवगिरीच्या किल्ल्यावर दररोज चौघडा कोणत्या ठिकाणी वाजत असे ?
(७) गंधाच्या राशी कशाला म्हटले आहे ?
(८) 'तिला भेटेना तेथ कुणी वाली' या ओळीचा अर्थ काय ?
(९) लताबाईंनी कोणती इच्छा व्यक्त केली आहे ?
(१०) पक्षी शिकाऱ्याच्या जाळ्यात का अडकतात ?
(११) सुभाषचंद्र बोस यांना कोणत्या गोष्टीचे वाईट वाटे ?
(१२) कोणाच्या वेशात अति थाट असतो ?
(१३) गोदावरीबाई टेके यांना मृत्यू कशामुळे आला ?

- **दोन ते तीन वाक्यांत उत्तरे सांगा.** (५.४.२)

(१) सुलभाने कोकणात कोणकोणत्या नवीन गोष्टी पाहिल्या ?
(२) एडिसन लहान असताना इतर मुलांपेक्षा तो सर्वांना वेगळा का वाटे ?
(३) चंद्रशेखर आझाद इंग्रजांच्या हाती का सापडले नाही ?
(४) 'सायंकाळची शोभा' या कवितेत 'अचल फुलपाखरे' कशाला म्हटले आहे ? का ?

(५) 'हळूच या हो हळूच या' या कवितेत फुले वेगवेगळे खेळ खेळत आहेत असे का वाटते ?

(६) 'नोकरी ? ही केवळ नोकरी नाही' असे गॅओबाई का म्हणाल्या ?

(७) छोट्या मुंग्यांना सापासारखे मोठे प्राणी का घाबरतात ?

(८) लताबाईंनी लहान वयात जोपासलेला छंद त्यांच्या साह्याला कसा धावून आला ?

(९) 'माताजी, तुम्ही धन्य आहात !' असे सुभाषबाबू एका वृद्ध स्त्रीला का म्हणाले ?

(१०) 'कोणत्याही गोष्टींचा अतिरेक वाईट असतो' हे पटवून देण्यासाठी कवीने कोणकोणत्या गोष्टी सांगितल्या आहेत ?

(११) गोदावरीबाई खूप शूर होत्या, हे तुम्हांला ज्या प्रसंगावरून वाटते, तो प्रसंग सांगा.

- **गाळलेल्या जागी पाठातील योग्य शब्द भरा. (५.४.१)**

(१) .................... दाट झाडीतून येणारे पक्ष्यांचे आवाज सुलभाला नवीन होते.

(२) एडिसनच्या हातून .................... नावाचा ज्वालाग्राही पदार्थ खाली सांडला व त्यामुळे डब्याला आग लागली.

(३) .................... त्यांच्या निर्जीव शरीरावर गोळ्यांचा वर्षाव चालला होता.

(४) या .................... मला माझ्या आईची खरी ओळख पटली.

(५) उत्तम संघटना करून जगणारा .......... दुसरा प्राणी क्वचितच आढळतो.

(६) "................ मी शिकले नाही, पण तुम्ही शिका."

(७) 'त्यासाठी देशाला हवंय बलिदान, .................... बलिदान.'

(८) .................... उभा राहिला आणि शाळेला जाण्याची मुलांची एक अडचण दूर झाली.

(९) ............ आकाशात झेपावू लागल्या.

(१०) 'काय एकेकाचे आवाज ............ आहेत रे !'

- **कोण, कोणास म्हणाले ते सांगा.** (५.४.१)

(१) 'आम्ही हे नेहमीच पुस्तकात वाचतो.'
(२) 'हे व्रण मला इंग्रजांचं शासन उखडून टाकण्याचा हुकूम देतात.'
(३) 'तुला तुझ्या आईची लाज वाटते ?'
(४) 'लता, तुलाच राहू दे तो कोट.'
(५) 'महाराज, मी तुमचा उपदेश विसरलो नाही.'
(६) 'बंधूंनो आणि भगिनींनो ! आपली मातृभूमी स्वतंत्र झालीच पाहिजे.'
(७) 'केलेली मदत कधी वाया जात नाही बघ.'
(८) 'तुम्हांला काय बक्षीस पाहिजे, बोला.'

- **खालील प्रश्नांची पर्यायी उत्तरे दिलेली आहेत, त्यांतील योग्य उत्तरासमोर ✓ अशी खूण करा.** (५.४.२)

**(१) सुलभाच्या घराभोवती झाडे नव्हती; कारण -**

(अ) सुलभाला झाडे लावण्याची आवड नव्हती.
(ब) तिथे झाडे लावली तरी येतच नव्हती.
(क) झाडे लावायला तिच्या घराभोवती जागा नव्हती.
(ड) सुलभाला झाडे लावायला वेळ मिळत नव्हता.

**(२) किल्ल्याच्या महाद्‌वारावरील लोखंडी पत्र्यावर अणकुचीदार खिळे ठोकलेले असत; कारण -**

(अ) दाराची शोभा वाढावी.
(ब) त्यावेळी तशी पद्‌धत होती.
(क) शत्रूच्या हत्तीपासून दाराचा बचाव व्हावा.

(३) कळीच्या अंगाला हळुवारपणे हात लावून झुळूक पळाली; कारण -

(अ) झुळकेला कळीची गंमत करायची होती.

(ब) तिला कळीला त्रास द्यायचा होता.

(क) रडणारी कळी झुळकेला पाहायची नव्हती.

(४) गोविंदाच्या वडिलांना आकस्मिक मृत्यू आला; कारण -

(अ) आजारपण.

(ब) मोटार अपघात.

(क) नदीचा पूर.

(ड) ओढ्याला आलेला पूर.

- **प्रत्येकी दोन-दोन समानार्थी शब्द लिहा. (९.४.१)**

| | |
|---|---|
| राजा | मार्ग |
| तनू | पोपट |
| फूल | झाड |
| सोने | पक्षी |
| आई | |

- **विरुद्ध अर्थाचे शब्द सांगा. (९.४.१)**

| | |
|---|---|
| अचल | दुर्दैवी |
| शत्रू | स्वतंत्र |
| सावध | मृत्यू |
| बलाढ्य | अपमान |
| सुगंध | सदाचार |

- **खाली काही वाक्प्रचार आणि त्यांचे अर्थ दिले आहेत. त्यांच्या योग्य जोड्या लावा. (९.४.१)**

| अ | ब |
|---|---|
| बस्तान बसवणे | एकदम खूप राग येणे |
| पित्त खवळणे | त्वेषाने हल्ला चढवणे |
| तुटून पडणे | संपवून टाकणे |

| | |
|---|---|
| डोळे झाकून जाणे | आपणहून मरण पत्करणे |
| फडशा पाडणे | घरात होणारा खर्च भागणे |
| घर चालणे | अर्थ न समजता पाठांतर करणे |
| पोपटपंची करणे | कोणताही विचार न करता जाणे |
| मृत्यूला मिठी मारणे | जम बसवणे |

- **एकाच शब्दाचे दोन-दोन अर्थ होतात, ते कोणते सांगा.** (९.४.१)

**जसे — वाली** - रक्षणकर्ता **वाली** - एका वानराचे नाव

**तळी** - तळाला **तळी** -

**कर्ण** - कान **कर्ण** -

**पार** - पलीकडे **पार** -

**हार** - फुलांचा हार **हार** -

**पात्र** - कारणीभूत **पात्र** -

**अंतर** - मन **अंतर** -

- **खालील शब्दांसाठी पाठात आलेले समूहदर्शक शब्द सुचवा.** (९.४.१)

**जसे — आंब्यांची - राई**

(१) मुंग्यांची -

(२) गंधाच्या -

(३) पोपटांचा -

- **खालील शब्दसमूहांसाठी एक शब्द सुचवा.** (९.४.१)

**जसे — गावचा कारभार चालवणारी सभा — ग्रामपंचायत**

(१) ज्याच्याजवळ शस्त्र नाही असा —

(२) शोध लावणारा —

(३) मजकुराची निवड व मांडणी करणारा —

(४) पटकन पेट घेणारा —

- दिवसेंदिवस, तासन्तास अशा प्रकारचे आणखी पाच शब्द सांगा. (९.४.१)

- खालील प्रत्येक गटातील शुद्ध शब्द ओळखा. (४.४.२)

| | | |
|---|---|---|
| (१) आरुंद | अरूंद | अरुंद |
| (२) विक्षिप्तपणा | विक्षीप्तपणा | विक्षित्पपणा |
| (३) क्रांतीकारक | कृांतिकारक | क्रांतिकारक |
| (४) लक्ष्यपूर्वक | लक्षपूर्वक | लक्षपुर्वक |
| (५) अशिक्षित | अशिक्षीत | अशीक्षित |
| (६) जाणीवपूर्वक | जाणिवपुर्वक | जाणिवपूर्वक |

- तर काय झाले असते, ते सांगा. (५.४.२)

(१) साधूमहाराजांनी पोपटाला अभय दिले नसते –
(२) लताबाईंना लहानपणी त्यांच्या वडिलांनी गाणे शिकवले नसते –
(३) एडिसनच्या हातून गाडीत फॉस्फरस सांडला नसता –
(४) चंद्रशेखरांच्याबाबत फितुरी झाली नसती –
(५) मुंग्यांची संघटना नसती –
(६) गोविंदाला त्याच्या मित्रांनी मदत केली नसती –

- का ते सांगा. (५.४.२)

(१) चंद्रशेखर आझाद हुलकावणी देण्यात पटाईत असतानाही इंग्रजांच्या हाती सापडले.
(२) देवगिरी किल्ल्याची पडझड खूप झाली आहे.
(३) साधूमहाराजांनी पोपटाची परीक्षा घ्यायचे ठरवले.
(४) स्वतःचा बचाव कसा करावा, हे पोपटाने पाठ केले होते, तरीही तो जाळ्यात अडकला.
(५) प्रधानाला शेवटी लहान तोंडी मोठा घास घ्यावा लागला.

- **खालील ओळी वाचून तुमच्या नजरेसमोर कोणते चित्र उभे राहते ते सांगा.** (३.४.३)

  (१) शेतामंधी भाऊराया । आला पीक गोंजारत ।
  हात जोडीसन केला । धरत्रीले दंडवत ॥

  (२) झाडांनि किति मुकुट घातले डोकिस सोनेरी
  कुरणांवर शेतात पसरला गुलाल चौफेरी !

  (३) लावून अंगुली कलिकेला हळुवार ।
  ती फुलुनि बघे तो व्हावे पार पसार ॥

- **विशेषण आणि नाम यांच्या योग्य जोड्या लावा.** (६.४.१)

| अ | ब | अ | ब |
|---|---|---|---|
| उंच | पुरुष | वृद्ध | राग |
| वीर | पत्रा | गरम | सभा |
| निर्जीव | रात्र | अनेक | कुमुद |
| अंधारी | इमारती | थोरली | कोट |
| लोखंडी | शरीर | जंगी | स्त्री |

- **खालील शब्दांपैकी दोन्ही वचनांत एकच रूप राहते, असे शब्द शोधून त्याखाली रेघ ओढा.** (६.४.१)

  हत्ती, वस्तू, साधू, पेन, माणूस, किल्ला, उंट, शिक्षक, वही, घड्याळ.

- **शब्द आणि लिंग यांच्या जोड्या दिल्या आहेत. त्यांतील चुकीच्या जोड्या कोणत्या ते सांगा.** (६.४.१)

  (१) फूल - नपुसकलिंग (२) सीताफळ - स्त्रीलिंग
  (३) वाडा - पुल्लिंग (४) किल्ली - स्त्रीलिंग
  (५) वाघ - पुल्लिंग (६) डबा - पुल्लिंग
  (७) किल्ला - स्त्रीलिंग (८) बाग - स्त्रीलिंग

- **'पोळीभाजी' हा जोडशब्द आहे. या शब्दात 'पोळी' या शब्दाला 'भाजी' हा शब्द जोडून आला आहे. त्याप्रमाणे खालील शब्दांपुढे कोणते शब्द येतील ? (९.४.१)**

(१) चहा .......... (२) भाजी ..........

(३) तूप .......... (४) पान ..........

- **तुम्हांला असलेल्या एखादया छंदाविषयी बारा ते पंधरा वाक्यांत माहिती लिहा. (४.४.३)**

- **मेईला आपल्या आईच्या व्यवसायाची खरी ओळख पटल्यावर ती मैत्रिणीला आपल्या आईबद्दल काय सांगेल ते तुमच्या शब्दांत लिहा. (४.४.३)**

- **'अति तिथं माती' या पाठातील राजाविषयी तुम्हांला काय वाटते, ते दहा वाक्यांत लिहा. (४.४.३)**

- **तुम्ही पाहिलेल्या सूर्योदयाच्या दृश्याचे वर्णन दहा वाक्यांत लिहा. (४.४.३)**

- **खालील वाक्ये वळणदार अक्षरांत, दुरेघीत लिहा. (४.४.१)**

(१) 'सांकव म्हणजे दोन काठांना जोडणारा पूल.'
(२) 'मुलाचे पाय पाळण्यात दिसतात.'
(३) 'मला माझ्या आईचा अभिमान वाटतो.'
(४) वृत्त घडले शिवभूपकर्णि जाता ।
वदे आनंदे 'धन्य धन्य माता ।'
(५) 'प्रमाणामध्ये सर्व काही असावे.'

- **कोण ते सांगा. (५.४.१)**

(१) धरित्रीला नमस्कार करणारा.
(२) एडिसनला गाडीतून हाकलून देणारा.
(३) लहान वयात वेताच्या फटक्याची शिक्षा शांतपणे सहन करणारा.

(४) हिरे, माणिक, पाचूच्या रंगांसारखे पंख असणारी.
(५) स्वतःमधील मध खाण्यास बोलावणारी.
(६) आई झाडूवाली असूनही तिचा अभिमान बाळगणारी मुलगी.
(७) प्रचंड प्रमाणात मुंग्यांना जन्म देणारी.
(८) शिवप्रभूंनी 'धन्य धन्य माता' असे उद्गार जिच्याबद्दल काढले ती स्त्री.
(९) कळीच्या अंगाला हळुवार हात लावून पळून जाणारी.
(१०) 'तेल संपले, तूप संपले' म्हणणारी.

- **खालील शब्दांचा योग्य क्रम लावा. अर्थपूर्ण वाक्ये तयार करा.** (४.४.२)

(१) पऱ्ह्यात नाचली खळखळ खूप आवाज ती करणाऱ्या.
(२) वेगवेगळ्या फार एडिसनला होता प्रयोगासाठी नाद जमवण्याचा वस्तू.
(३) बांधला तट होता हा वर्षांपूर्वी सहाशे.
(४) हिंस्र प्राणी मुंगी आहे व बलाढ्य हा.
(५) राज्यात गाण्यात आजपासून बोलायचं सगळ्यांनी आमच्या.

- **खालील चित्राचे निरीक्षण करा. माहिती सांगा.** (२.४.३)






# चक्रव्यूह भेदा (६.४.१)

**विशेषणांचा अभ्यास.**

सूचना : हा खेळ दोन विद्यार्थ्यांना खेळता येईल.
वेळ ५ मिनिटे.

बाहेरच्या वर्तुळात १२ नामे आहेत. त्यांना समर्पक अशी विशेषणे आतील तीन वर्तुळांत सापडतील. एका विद्यार्थ्याने प्रथम एक नाम घेऊन त्याला लागणारे योग्य विशेषण आतील वर्तुळात शोधण्यास सुरुवात करावी. प्रथम वर्तुळ निवडावे. नंतर विशेषण शोधावे. वर्तुळे निवडणे चुकल्यास तो बाद होईल. वर्तुळ निवडले व विशेषण चुकले, तर १ गुण वर्तुळ व विशेषण दोन्ही अचूक शोधल्यास २ गुण. याप्रमाणे जो अधिक गुण घेईल तो जिंकेल. वर्तुळातील नामे व विशेषणे बदलून खेळता येईल.



